

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

संपादक

या. रा. ढवळे

वर्ष ३२ : अंक १२८        जानेवारी-फेब्रुवारी-मार्च १९५९

या अंकांत

प्रा. भवानीशंकर पण्डित, श्री. पण्डित शेटे, प्रा. गो. म कुलकर्णी, प्रा. वसन्त कानेटकर, प्रा. व. दि. कुलकर्णी, प्रा. रा. भि. जोशी, प्रा. शान्ता ज. शेळके, श्री. म. श्री. दीक्षित ('ग्रंथसूचि' १९५८), शिवाय संपादकीय, वार्षिक इतिवृत्त, ताळेबंद व नवा अर्थसंकल्प, इत्यादि.

# साभार-स्वीकार

## कॉंटिनेन्टल प्रकाशन पुणें २ यांचीं प्रकाशनें:—

१. झोका ( कथा )-अच्युत बर्वे; ३=५० रु.

२. गाडगीळांच्या कथा-संपा. श्री. पु. भागवत; ३=५० रु.

## मौज प्रकाशनें-खटाववाडी, मुंबई ४

३. वळीव ( कथा )-शंकर पाटील; ४=५० रु.

४. मर्ढेकरांची कविता-बा. सी. मर्ढेकर; ५ रु.

५. सुलभा (कथा)-श्री. ज. जोशी; ५ रु.

६. पडघवली ( द्वि. आ. )-गो. नी. दांडेकर; ६ रु.

७. शितू ( द्वि. आ. )-गो. नी. दांडेकर; ५ रु.

८. हद्दपार ( द्वि. आ. )-श्री. ना. पेंडसे; ५ रु.

९. चिंतन लहरी-प्रा. श्री. मा. कुलकर्णी; उन्मेष प्रकाशन, कर्नलबाग, नागपूर २; ३=५० रु.

१०. सुश्लोक-श्रीगुरुचरित्र-विष्णुसुत, उंब्रजकर, रा. वि. कुलकर्णी २४८ सोमवार, कराड ( उ. सातारा ); १६ न. पै.

११. नवी वाट ( नाटक )-बा. मा. कारंडे गुरुजी, खेरवाडी, पूर्वबार, मुंबई २१.

१२. नामामृत लहरी-कै. वि. गो. रानडे, भोर.

१३. पर्वकाल ये नवा ( व चार संगीतिका )-यशवंत; सौ. नीराबाई पेंढरकर, ११६।३४ सदाशिव, पुणें २; २ रु.

१४. वसुंधरा ( कविता )-प्रताप; चित्रशाळा प्रकाशन, पुणें २.

१५ चार्वाक-इतिहास आणि तत्त्वज्ञान-सदाशिव आठवले, प्राज्ञ पाठशाळा, वाई; ३ रु.

## मराठी साहित्य-परिषद्, आंध्र-प्रदेश हैद्राबाद पुरस्कृत प्रकाशनें,

१६. हुंकार-( कविता ) लक्ष्मीकांत तांबोळी, ७५ न. पै.

१७. रुजवा ( कविता )-रवींद्र बोरगांवकर, ७५ न. पै.

१८. चित्रकार पिंपळखरे-संपादक वि. वि. जोशी, न. का. घारपुरे; म. पु. वैद्य ७६६ सदाशिव, पुणें २; ५० न. पै.

## स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर यांचीं प्रकाशनें:—

१९. संगीताने गाजलेली रंगभूमि-न. वि. तथा बाबूराव जोशी; ४ रु.

२०. यांगत्सीच्या तीरावर-सौ. सुलोचना लिमये; २=५०.

२१. जगावेगळो-( नाटक ) ना. धों. ताम्हणकर; १=५० रु.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

संपादक - मंडळ
भ. श्री. पंडित
गो. म. कुलकर्णी
अरविन्द मंगरूळकर
भगवन्त देशमुख

वर्ष ३२, अंक १२८ जानेवारी—फेब्रुवारी—मार्च १९५९

## वाङ्मयसमालोचन ( १९५८ )
## विशेषांक



संपादकीय
पत्रव्यवहाराचा पत्ता :
१२६ डी. फणसवाडी, मुंबई २.

महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणे २.

[ पान ४ वरून पुढे ]

अत्यंत बाणेदारपणाने कित्येक वर्षे त्यांनी वाहिली. गीतेप्रमाणेच त्यांचा समर्थ वाङ्मयाचाहि अभ्यास गाढा होता. लोकमान्य टिळकांची संपादकीय परंपरा त्यांनी साक्षेपाने चालविली ही त्यांची कामगिरी लहानसान नव्हे.

कै. गं. भा. निरंतर यांचें निधन जितकें शोकजनक तितकेंच त्यांचें जीवनहि शोकजनकच होतें. अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत त्यांनी एम्. ए. पर्यंतचा आपला अभ्यास पूर्ण केला व आपल्या जीवनाला व लेखनाला आकार व प्रतिष्ठा देण्यांतच त्यांचें आयुष्य खर्ची पडलें. साहित्य व साहित्यविषयक चळवळी यांत समरस होण्यांतच त्यांना सात्त्विक आनंद लाभत असे. ते अबोल, निगर्वी, निरलस, निरहंकारी व सात्त्विक वृत्तीचे गृहस्थ होते. इ. स. १९४३ ते १९४८ व इ. स. १९५२ ते १९५५ या अवधींत ते महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे सदस्य होते व १९४६ ते १९४८ व इ. स. १९५२ ते १९५५ या अवधींत परिषदेचे चिटणीस म्हणूनहि त्यांनी काम केलेलें आहे. त्यांच्या नेतृत्वामुळे परिषदेच्या कार्याला एकप्रकारची शिस्त व प्रतिष्ठा प्राप्त होण्यास जशी मदत झाली त्याचप्रमाणे प्राज्ञ-विशारद परीक्षांना लोकप्रियता लाभण्याच्या दृष्टीनेहि त्यांचे प्रयत्न कारणीभूत झाले. त्यांनी अनेक पुस्तकें लिहिलीं, भाषान्तरें केलीं, विद्यार्थ्यांच्या दृष्टीने उपयुक्त असें अनेक पुस्तकांचें संपादनहि केलें. कित्येक नियतकालिकांमध्ये पुस्तक-परीक्षणेंहि त्यांनी नियमितपणाने लिहिलीं आहेत. प्रतिष्ठेने जीवन जगतां यावें म्हणून सर्व आयुष्यभर त्यांची धडपड सुरू होती. त्यामुळे निरंतरांना आयुष्यांत निवांतपणा असा कधीच मिळाला नाही. त्यांचें सर्वच लिखाण त्यामुळे धावतें असेंच झालें. म्हणूनच त्यांच्या अकालीं नि अकस्मात् निधनाबद्दल दुःख वाटतें. एका सात्त्विक, सत्प्रवृत्त, बुद्धिमान् व कार्यकुशल लेखकाच्या जीवनाची शोकान्तिका झाली असें त्यांच्या जीवनाकडे पाहिलें म्हणजे वाटूं लागतें व त्यांच्याबद्दल अन्तःकरणास हळहळ वाटते. इतकेंच नव्हे तर, मनांत एक असा विचार येतो की, विद्यार्थि-समाज व साहित्य यांच्या उन्नतीसाठी ज्याने आपल्या आयुष्याची आहुति दिली त्याच्या कुटुंबासाठी सरकार व समाज कांही करणार आहे काय?

कै. वि. ज. सहस्रबुद्धे यांचें निधन भीषण अपघातामुळे झालें. त्यामुळे व ते मिरज येथील सर्व सार्वजनिक, साहित्यिक, सांस्कृतिक कार्यांत समरसतेने भाग घेणारे जबाबदार कार्यकर्ते असल्यामुळे, त्यांच्या आकस्मिक निधनाची दुःखद छाया मिरज येथे भरणाऱ्या साहित्य-संमेलनावर पडली हें साहजिकच होय. श्री. सहस्रबुद्धे यांचें शिक्षण अल्प असलें तरी त्यांनी व्यासंगाने व अभ्यासाने आपली बौद्धिक पातळी वाढविली होती. शिवाय ते कवि व काव्याचे रसिक होते. 'पद्यमीमांसा' हा त्यांचा ग्रंथ त्यांच्या मार्मिक व साक्षेपी अभ्यासाचा निदर्शक होय. पद्यमीमांसेच्या शास्त्रांत त्यांनी 'छन्दोरचना'कार डॉ. माधवराव पटवर्धन यांच्याशींहि दोन हात केलेले आहेत ही एकच गोष्ट त्यांच्या त्या शास्त्रांतील ज्ञानाची साक्ष देण्यास पुरेशी आहे.

वरील सर्व ग्रंथकारांच्या कुटुंबियांच्या दुःखांत मी सहभागी आहें.

— वा. रा. ढवळे

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र.

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : या. रा. ढवळे

वर्ष ३२, अंक १२८ जानेवारी–फेब्रुवारी–मार्च १९५९

# संपादकीय

## वाङ्मय–समालोचन अंक

'पत्रिके'चा प्रस्तुतचा अंक हा वाङ्मय-समालोचन खास अंक असून, तो मिरज येथे भरणाऱ्या मराठी साहित्य संमेलनाच्या ४१ व्या अधिवेशनाच्या प्रसंगीं प्रसिद्ध होत आहे. ही वस्तुस्थिति जितकी औचित्यपूर्ण तितकीच ती उपयुक्तहि आहे. या अंकांत इ. स. १९५८ सालीं प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयाचें समालोचन करण्यांत आलें असून, त्या वाङ्मयाची स्वतंत्र सूचिहि देण्यांत आली आहे. अध्यक्षीय भाषणांत पूर्वीं गतसालांतील वाङ्मयाचा धावता परामर्श घेण्याची क्वचित् प्रथा होती. पण अलीकडच्या काळांत ती आजिबात बंद झाली आहे. झालें हें कांहीं वाईट झालें नाही. कारण एकतर असा परामर्श हा अपुरा व जंत्रीवजा असे व दुसरें म्हणजे असा आढावा घेण्यांतच अध्यक्षांचें तीनचतुर्थांश भाषण खर्ची पडत असे. पण साहित्य संमेलनाच्या वार्षिक अधिवेशनाच्या वेळीं, गेल्या सालांतील वाङ्मयाचें स्वरूप व त्या वाङ्मयाचे उल्लेखनीय विशेष कोणते होते याची कल्पना संमेलनाला वाङ्मयप्रेमाने जमलेल्या प्रतिनिधींना अगर प्रेक्षकांना येणें मात्र आवश्यक होय हें मान्यच करावें लागेल. पण असें समालोचन करणारा खास अंक प्रसिद्ध करणें हें अतिशय खर्चाचें व दगदगीचें काम असल्यामुळे, साहित्य परिषदेला तें आतापर्यंत करतां आलें नाही. पण गेल्या वर्षीं मालवण येथे श्री. आ. रा. देशपांडे (अनिल) यांच्या अध्यक्षतेने भरलेल्या साहित्य संमेलनांत अशा समालोचनासाठी प्रतिवर्षी रु. २५० ची देणगी माननीय श्री. काकासाहेब गाडगीळ यांनी तारेने जाहीर केल्यामुळे, समालोचनाच्या कार्याला या वर्षापासून माफक प्रमाणांत सुरुवात करण्यांत येत आहे. ही देणगी दिल्ली येथील 'बृहन्महाराष्ट्र समाज बिल्डिंग ट्रस्ट'च्या विद्यमाने देण्यांत येणार असून ती प्रतिवर्षी मिळणार आहे. ही एक अत्यंत समाधानाची व स्वागतार्ह गोष्ट होय. या देणगीबद्दल 'बृहन्महाराष्ट्र समाज बिल्डिंग ट्रस्ट'ची साहित्य परिषद् ऋणी राहीलच; पण ज्यांच्या प्रेरणेने नि मध्यस्थीने ही देणगी मिळाली त्या श्री. काकासाहेब गाडगीळ यांचीहि परिषद् ऋणी राहील.

या वर्षी कविता, कथा, कादंबरी, नाटक, समीक्षणात्मक वाङ्मय, लघुनिबंध, प्रवास व विनोदी व संकीर्ण लेख व चरित्र-आत्मचरित्रे इत्यादि वाङ्मय-प्रकारांचेंच समालोचन करतां आलें व बालवाङ्मयासारखे कित्येक प्रकार गळले आहेत याची जाणीव संपादकांना आहे. पण कोणतीहि योजना मर्यादेंत बसवितांना असें होणें थोडें अपरिहार्य असतें. उत्तरोत्तर या उणीवाहि शक्य तितक्या दूर करतां येतील एवढेंच आश्वासन तूर्त देणें शक्य आहे. हें समालोचन अगदी अल्प मुदतींत करून पत्रिकेशीं व पर्यायाने परिषदेशीं सहकार्य केल्याबद्दल सर्व समालोचकांचे आभार मानणें आवश्यक आहे. संपादकांवर अगर परिषदेवर कोणत्याहि प्रकारच्या अटी न लादतां एका थोर कर्तव्यबुद्धीने सर्वच समालोचन-लेखकांनी आपलें लेखन मुदतींत पाठविलें यांत या सर्वच लेखकांचें सौजन्य व परिषदेच्या कार्याबद्दलची त्यांची आत्मीयताच दिसून येते, यांत शंका नाही. श्री. काकासाहेब गाडगीळ हे स्वतःच एक नामवंत ग्रंथकार असून साहित्य परिषदेच्या कार्याबद्दल अत्यंत सहानुभूति व कळकळ बाळगणारे मर्मज्ञ समाजसेवक आहेत. चांगल्या उपक्रमाबद्दल व कार्याबद्दल प्रसंगीं आर्थिक झीजहि सोसावयास ते प्रवृत्त झालेले आढळून येतात. म्हणूनच त्यांच्या प्रोत्साहनाने सुरू होत असलेल्या या समालोचनाच्या उपक्रमांत उत्तरोत्तर इष्ट अशी प्रगति होत जाईल अशी आशा करावयास प्रत्यवाय नाही. निदान आर्थिक अडचणीमुळे प्रगति रोखली जाणार नाही.

## संमेलनाध्यक्ष प्रा. श्री. के. क्षी.

मिरज येथे ता. १६ ते १९ मे रोजीं भरत असलेल्या मराठी साहित्यसंमेलनाच्या ४१ व्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून नामवन्त टीकाकार प्रा. श्री. के. क्षीरसागर यांची निवड झालेली आहे. या निवडीबद्दल मी त्यांचें हार्दिक अभिनंदन करतों. प्रकृतीचें सतत अस्वास्थ्य लाभलेलें असूनहि गेलीं २० वर्षें मराठी भाषा व वाङ्मय यांच्या प्रगतीची व उत्कर्षाची चिन्ता प्रा. क्षीरसागरांनी अव्यभिचारी निष्ठेने वाहिलेली आहे याची साक्ष त्यांचें लेखन व टीकालेखनच देऊं शकेल. वाङ्मयीन अगर भाषिक प्रश्नांचा विचार करतांना देश व समाज यांच्या उत्कर्षाचा व स्वास्थ्याचाहि विचार त्यांनी समन्वयाने केलेला आहे हें त्यांच्या लेखनाचें उल्लेखनीय वैशिष्ट्य नजरेआड करून चालणार नाही. समाजांतील अनिष्ट प्रवृत्ति व प्रकार यांच्यावर जशी त्यांनी हिरीरीने टीकेची झोड उठविली, त्याचप्रमाणे वाङ्मयांतील अनिष्ट प्रवृत्ति व प्रकार यांचाहि त्यांनी आपल्या प्रभावी, प्रखर व झुंजार लेखनशैलीने खरपूस समाचार घेतलेला दिसून येईल. मूर्तिपूजनाबरोबरच मूर्तिभंजनहि त्यांनी प्रामाणिकपणाने केलेलें आहे. त्यांचें वाङ्मय जरी विपुल नसलें तरी जें आहे तें सकस आहे. वाङ्मयीन टीकाकार व पत्रकार या दोन्हीहि भूमिका एकसमयावच्छेदेंकरून आपल्या लेखनांत कटाक्षाने त्यांनी पाळलेल्या आहेत असें दिसतें. ह्या दृष्टीने कै. विष्णु कृष्ण चिपळूणकर, लोकहितवादी, आगरकर, टिळक व केळकर यांच्या ध्येयवादी परंपरेचा वारसा त्यांच्याकडे आलेला आहे, असें म्हटलें तर अतिशयोक्ति होऊं नये. अर्थात् यांच्या स्पष्ट खुणा त्यांच्या टीकालेखनांत आढळून येतात. वाङ्मयीन व सामाजिक प्रश्नांबद्दल जिवन्त उत्साह व आस्था बाळगणारा प्रा. क्षीरसागरांसारखा अध्यक्ष संमेलनाला लाभलेला असल्यामुळे संमेलन यशस्वी होईल यांत शंका नाही. प्रा. क्षीरसागर व संमेलन यांना मी सुयश चिंतितों.

## राजकवि यशवन्तांचें अभीष्टचिंतन

मराठी वाचकांचे आवडते कवि यशवन्त ऊर्फ श्री. यशवन्त दिनकर पेंढरकर यांच्या वयाला ता. ९ मार्च १९५९ रोजीं साठ वर्षें पुरीं होऊन, त्यांनी ६१ व्या वर्षांत पदार्पण केलें. यां ६१ व्या

वाढदिवसानिमित्त सर्व मराठी प्रांतांत त्यांचे सत्कारसमारंभ होत आहेत व कांही होऊंहि गेलेले आहेत. त्या वाढदिवसानिमित्त त्यांचा प्रथम जाहीर सत्कारसमारंभ भव्य प्रमाणांत करण्याचें भाग्य मुंबई शहराला लाभलें. इ. स. १९५० सालीं मुंबई येथे भरलेल्या मराठी साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदीं मुंबईकरांनी त्यांचीच निवड केलेली असल्यामुळे, त्यांचा षष्ट्यब्दीपूर्ति-समारंभ प्रथम मुंबईतच व्हावा हें औचित्यपूर्णच म्हटलें पाहिजे. हा समारंभ सुप्रसिद्ध कादंबरीकार श्री. वि. स. खांडेकर यांच्या अध्यक्षतेने साजरा झाल्यामुळे समारंभाच्या औचित्यांत व यशांतहि विशेष भर पडली. नाटकें, काव्यगायन, यशवन्त-गुणगौरव वगैरे कार्यक्रमांनी भरगच्च असा चार दिवसांचा सत्कारसमारंभ ता. २६ ते २९ मार्च या मुदतींत साजरा झाला. या बाबतींत मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाने पुढाकार घेऊन, मुंबईतील अनेक साहित्यसंस्था, सांस्कृतिक केन्द्रें व साहित्यप्रेमी व्यक्ति यांच्या सहकार्याने हा समारंभ घडवून आणला हें विशेष होय.

या गौरव-समारंभाचा एक उल्लेखनीय विशेष नमूद करावयाचा म्हणजे यशवंतांच्या ‘जयमङ्गला’ या खंडकाव्याचा श्री. श्री. भि. वेलणकर यांनी केलेला समवृत्त संस्कृत अनुवाद पुस्तकरूपाने प्रसिद्ध करून तो रु. २००१ च्या थैलीबरोबरच यशवंतांना सभेंत अर्पण करण्यांत आला हा होय. हें प्रकाशन गौरवाचा एक भाग म्हणून करण्यांत आलें व तें के. भि. ढवळे, प्रकाशन संस्थेचे सध्यांचे चालक श्री. बा. ग ढवळे यांनी विनामूल्य छापून दिलें. ज्यांनी ज्यांनी सत्कार-समारंभाशीं सक्रिय सहकार्य केलें त्यांना हें प्रकाशन विनामूल्य देण्यांत येत आहे. जयमङ्गलेचे अनुवादक श्री. वेलणकर यांचें संस्कृत भाषेवरील प्रभुत्व वाखाणण्यासारखें असून, त्यांच्या संस्कृतच्या व्यासंगाची स्पष्ट कल्पना या अनुवादावरून यायला हरकत नाही. मराठींतील अशाच कांही लोकप्रिय खंडकाव्यांचा व स्फुट कवितांचा संस्कृतांतून अनुवाद श्री. वेलणकर यांनी केल्यास इतर भाषिकांना मराठी काव्याचा परिचय संस्कृतच्या द्वारा करून देण्याची मराठी भाषेची थोर सेवा केल्याचें श्रेय त्यांच्या पदरांत पडल्याशिवाय राहणार नाही. श्री. वेलणकर यांनी हें कार्य करावें अशी माझी त्यांना प्रकट सूचना आहे. जयमङ्गलेच्या उत्कृष्ट अनुवादाबद्दल ते निःसंशय अभिनंदनास पात्र आहेत.

कवीच्या अगर लेखकाच्या यशाचें व लोकप्रियतेचें माप मोजण्याचें एक साधन म्हणजे त्याच्या पुस्तकांचीं अन्य भाषांत झालेलीं भाषान्तरें होत. कवि यशवन्त यांना हें भाग्य लाभलें आहे यांतच त्यांच्या काव्याचें मोठेपण होय. गेलीं सतत चाळीस वर्षें अव्याहतपणाने यशवन्त काव्य-लेखन करीत असून, त्या वाङ्मयप्रांतांतील लोकप्रियतेचें शिखर त्यांनी गाठलेलें आहे. ही वस्तुस्थिति त्यांना भूषणावहच होय. प्रतिकूल परिस्थितीशीं सतत झुंज खेळून, अनेक दुःखें व आपत्ति सहन करून, त्यांनी काव्याची अव्यभिचारी निष्ठेने आमरणावत् सेवा केलेली आहे. व्यक्तिशः निर्धन राहूनहि त्यांनी काव्यवाङ्मय समृद्ध केलें आहे. ज्या रविकिरण मंडळाचे ते सभासद आहेत त्या रविकिरण मंडळाच्या काव्यक्षेत्रांतील कामगिरीचें मूल्यमापन तटस्थपणाने करण्याची वेळ अद्यापि यावयाची आहे, असेंच मला वाटतें. जें मूल्यमापन थोडेंफार आज झालें आहे तें नुसतें अपुरेंच नव्हे, तर अज्ञानमूलक अगर थोडाफार गैरसमज निर्माण करणारें आहे. सामान्यत्वाचा आरोप त्यांच्या काव्यावर करणाराला रविकिरण मंडळाच्या, विशेषतः माधव ज्यूलियन, यशवन्त व गिरीश यांच्या काव्यांतील असामान्यत्वाचें नीटसें आकलन झालें नाही हें मोठ्या खेदाने म्हणावें लागतें. इंग्रजी वाङ्मयांतील टीकेच्या वाचनाने व जुन्याच्या उलट नवीन काव्यप्रयोगांचें स्वागत करण्याच्या फाजील उत्साहाने

टीकारांची मनें दूषित झालीं व टीकेचा तोल सुटला असें निदान मला तरी वाटतें. नाहीतर जबाबदार टीकाकारांकडून माधव ज्यूलियन-यशवन्तांच्या काव्यावर सामान्यतेचा आरोप करण्याचें धाष्टर्य खचित झालें नसतें. रविकिरण मंडळाच्या कवींनी व विशेषतः यशवन्त, माधव ज्यूलियन या कवींनी जुनें झुगारून देऊन अन्तःकरणांतील सुख, दुःख, प्रेम इत्यादि भावनांचें प्रामाणिकपणानें व कौतुकास्पद आत्मनिष्ठेने आपल्या कवितांतून कलात्मक आविष्करण केलेलें असून, गोविन्दाग्रज व त्यांचे समकालीन कवि यांच्यानंतर मराठी कवितेला एक निराळेंच वळण लाविलेलें आहे यांत तिळमात्र शंका नाही. म्हणूनच रविकिरण मंडळाच्या कवींच्या काव्याचें, त्यांच्या प्रयोगशीलतेचें, त्यांच्या आत्मनिष्ठेचें, त्यांच्या कल्पकतेचें, इतकेंच नव्हे तर त्यांच्या बौद्धिक व कलात्मक पातळीचें योग्य असें मूल्यमापन होणें अत्यावश्यक आहे असें मला अजूनहि प्रामाणिकपणानें वाटतें. तें तसें होईल त्याच वेळीं, यशवन्तांच्या काव्याचें अनन्यसाधारणत्व प्रतीत होईल. यशवन्त आजहि काव्यविषयक प्रयोग करीत आहेत हें नुकत्याच त्यांच्या प्रसिद्ध झालेल्या 'पर्वकाल ये नवा' या संगीतिकांच्या संग्रहावरूनहि दिसून येण्यासारखें आहे. त्यांच्या वयाला साठ वर्षें पुरीं झालीं असलीं तरी त्यांची काव्यशीलता व प्रयोगशीलता आजहि रतिमात्र कमी झालेली नाही, म्हणूनच त्यांच्या एकसष्टीच्या प्रसंगीं हार्दिक अभिनन्दन करून त्यांना आरोग्य व दीर्घायु लाभो अशी सदिच्छा प्रकट करतों. कवि यशवन्त यांचें जीवन व त्यांची कविता हीं जर पडताळून पाहिलीं तर त्यांचें काव्य त्यांच्या जीवनाशीं कसें प्रामाणिक राहिलें आहे याचें प्रत्यन्तर यावें. असा प्रयत्न ग्रंथरूपानें झाल्यास पर्यायानें रविकिरण मंडळाच्या काव्याची उंची किती मोठी आहे, हेंहि ओघानेच दिसून येईल. असा ग्रंथ व्हावा हीहि एक माझी इच्छा मी येथे नमूद करून ठेवितों.

## दिवंगत ग्रंथकारांचें पुण्यस्मरण

गेल्या एक-दोन महिन्यांच्या कालावधींत एकामागून एक असे तीन ग्रंथकार कालवश झाले ही घटना अत्यंत शोकजनक होय. कै. ज. स. करंदीकर हे कांही मुदतीच्या आजारानंतर वयाच्या ८४ व्या वर्षी दिवंगत झाले असल्यामुळे त्यांचें निधन हें दुःखद असलें तरी अकालीं झालें असें म्हणतां येणार नाही. पण कै. गं. भा. निरंतर यांचें निधन हें तर अवघ्या ५२ व्या वर्षी व हृदय-विकाराचा झटका येऊन अगदी अकस्मात् व अनपेक्षितपणें व्हावें हें दैवदुर्विलसितच म्हटलें पाहिजे ! त्याचप्रमाणे यंदाचें साहित्य संमेलन मिरज येथेच व्हावें असा आग्रह धरणारे छन्दशास्त्राचे जाणकार व कवि मिरजेचे कै. वि. ज. सहस्रबुद्धे हे घरांत भडकलेल्या आगींत सर्वांग भाजून भीषण अपघातानंतर सहा तासांच्या अवधींत ता. २ एप्रिल १९५९ रोजीं मिशन हॉस्पिटलमध्ये निधन पावले ही घटना जितकी भीषण तितकीच ती हृदयद्रावक अशी झाली !

कै. ज. स. करंदीकर हे अगदी सुरुवातीपासून ध्येयवादाने प्रेरित होऊन लोकसेवेसाठी प्रवृत्त झालेले एक थोर व त्यागी असे गृहस्थ होते. पदवी घेतल्यावर कै. विजापूरकरांच्या 'समर्थ विद्यालयां'त ते दाखल झाले ते त्याच ध्येयवादामुळे. समर्थ विद्यालय सरकारी रोषाला बळी पडल्यावर करंदीकरांचा संबंध 'केसरी'शीं लेखक या नात्याने आला व तेथूनच 'संपादक' व विश्वस्त म्हणून ते सेवानिवृत्त झाले. 'कौटलीय अर्थशास्त्र' व 'गीतातत्त्वमंजरी' हे त्यांचे दोन ग्रंथ विशेष गाजले. 'केसरी'ची संपादकीय धुरा मोठ्या कौशल्याने व

( यापुढील मजकूर अनुक्रमणिकेच्या मागील बाजूस पहावा. )

प्रा. भवानीशंकर श्री. पंडित, एम्. ए.

# कविता

१९५८ मध्यें प्रसिद्धि पावलेल्या मराठी कवितेचा हा समालोचनपर संक्षिप्त आढावा आहे. हा आढावा केवळ प्रकाशित पुस्तकांपुरताच मर्यादित नाही. यांत मुख्य मुख्य नियत-कालिकांतील स्फुट कवितांचाहि यथावकाश समावेश व परामर्श आहे. समालोचक सर्वसाक्षी व सर्वज्ञ नाही. शिवाय लेखनालाहि कांही सीमा आहे. तेव्हा अज्ञानाने व अनवधानाने एखाद्या प्रकाशनाचा निर्देश राहून गेल्यास अपसमज करून घेऊं नये अशी क्षमायुक्त याचना आहे. हा आढावा घेतांना विवेचनाच्या व्यवस्थितीसाठीं कांही सोयिस्कर स्थूल विभाग पाडले आहेत.

**कथात्मक खंडकाव्य**

अ. श्री. भवाळकर यांच्या 'वसुधा' या कथात्मक खंडकाव्याने मध्यंतरीं जवळ-जवळ दोन तपें खंडित झालेली खंडकाव्यांची परंपरा पुन्हा नव्याने सुरू होण्याचीं लक्षणें दिसत आहेत. वसुधा ही या करुण पण ध्येयदर्शी काव्याची नायिका आहे. वैमानिक विश्राम आणि शास्त्रज्ञ निशिकांत या दोन तरुणांचें तिच्यावर सारखेंच प्रेम असतें. तिचा विश्रामशीं विवाह होतो आणि या विवाहांतून लहानग्या प्रमोदचा जन्म होतो. विश्रामाला आई नसते. बापूजी हे त्याचे वडील. ते सुनेला तळहातावरील फोडाप्रमाणे जपतात. वसुधेची रजनी नांवाची मैत्रीण असते. तिचें व निशिकांताचें लग्न व्हावें अशी तिची इच्छा. कारण तिला निशिकांताच्या गुप्तप्रेमाचा सुगावा नसतो. दुर्दैवाने विश्राम विमान-अपघातांत ठार होतो. पुत्रशोकाने बापूजी हाय खाऊन मरण पावतात आणि वसुधेला केवळ निशिकांताचा आधार उरतो. त्याच्या अनुपस्थितींत त्याने लिहिलेल्या दैनंदिनीवरून तिला तिच्यावरील त्याच्या गुप्तप्रेमाची कल्पना येते. एकदा प्रमोद रजनीबरोबर मुंबईला गेला असतांना तिचा निशिकांताशीं 'संबंध' हि येतो. इतक्यांत प्रमोद व रजनी मुंबईहून परततात. प्रमोद विषमाने आजारी होऊन येतो. वसुधा त्याच्या शुश्रूषेंत असतांनाच निशिकांताला दुचाकीचा अपघात होऊन तो रुग्णालयांत जातो. वसुधा प्रमोदच्या सेवेंत असल्यामुळें रजनी रुग्णालयांत निशिकांताची शुश्रूषा करते. वसुधेच्या अन्तर्मनाला वासनावश होऊन केलेल्या प्रमादाचा अनुताप होतो. पश्चात्तापाने पुनीत झालेल्या तिच्या आत्म्याला कर्तव्याची जाणीव होते. ती रजनी आणि निशिकांत यांच्या प्रेमाच्या मार्गांत येत नाहीं. उलट स्वयंसांत्वन करते—

'निशिकांतांनी केलें प्रेम जरी मजवरी न योग्यचि तें,  
मीहि स्वीकारावें योग्य न, ती विकृतीच मज गमतें !  
माझ्या अंकीं आहे सुत त्याचा भार मी कुणा देऊं ?  
कर्तव्यच्युत होऊनि दैवाचा रोष मी कसा साहूं !  
पत्नीहूनि माता हें स्त्रीचें कर्तव्य होय अधिकतर !  
जग वंदी मातेला, न स्त्रीला, मातृधर्म श्रेष्ठतर !  
वैवाहिक मम जीवन आयुष्यांतील होय इतिहास  
जीवन वाहे पुढती अडवुं नये वाहत्या प्रवाहास !  
पापाने न विटाळे, पुण्यानें मात्र होय पावन जे,  
उपकारक मज जीवन आदर्श असो सदैव सरितेचें.'

अशा रीतीने कर्तव्यतत्पर त्यागमय मातृप्रेमाच्या महतींत या काव्याचा शेवट झाला आहे. प्रस्तुत काव्य गाथासप्तशतीपासून महाराष्ट्रास प्रिय असलेल्या 'आर्या' या जातींत आहे.

मराठेशाहीच्या ऐन उमेदींत मोरोपंतांनी या लवचिक जातीचा पुनरुद्धार करून समाजांत तिचा प्रचार व प्रसार केला. ही जाती धावती असल्यामुळे कथाकथनास सोयीची आहे. अलीकडे मोगरे, विनायक, चंद्रशेखर, माधवानुज इत्यादिकांनी तिचा अवलंब केला होता. भवाळकरांच्या हातीं तिला पुन्हा संजीवन लाभलें आहे. आज लघुकथा गद्यांत लिहिली जात असतांना ती मुद्दाम पद्यांत सांगण्याचें प्रयोजन काय असा प्रश्न येथे उपस्थित होणें शक्य आहे. या संबंधांत Prose does its work by persuading, the poetry by moving हें मिल्चें मत ध्यानांत घेतलें पाहिजे. काव्यास गद्यापेक्षा पद्यांत प्राधान्य मिळतें. कारण पद्यांत संक्षिप्त व मनोरम अशा विशिष्ट वाक्यविन्यासाने अभिप्रेतार्थ सुंदररीतीने साधतां येतो. त्यांत अलंकारांनी अर्थास मनोहरता, अनुप्रासांनी शब्दांत मधुरता आणि स्वरांदोलनाने रचनेस नादमधुरता प्राप्त होते. मुद्रणकलेमुळे शब्दांतला अर्थ ( sense ) कायम राहिला परंतु नाद ( sound ) नष्ट झाला. गद्य डोळ्यांसाठी आहे आणि पद्य कानांसाठी आहे हें लक्षांत आलें म्हणजे गद्य लघुकथा व कथाकाव्य यांच्यांतलें अंतर स्पष्ट होईल.

भवाळकरांनी जवळजवळ हजारबाराशें ओळींचें हें काव्य लिहून काव्यरचनेसाठी आवश्यक असणारी चिकाटी निदर्शनास आणली आहे. या काव्यांतील निरनिराळे प्रसंग हृदयंगम असून कवीने आपल्या कल्पनाशक्तीने चालते बोलते केले आहेत. काव्यांत जागोजागीं योजलेले संकेत सूचक व संमत असून अन्वयावत् आहेत. काव्याच्या गतींत वेग व भावेंत ओघ आहे. काव्यांत विमानाचा व दुचाकीचा असे दोन अपघात ( accidents ) आहेत. ते दुसऱ्या अर्थाचे म्हणजे 'योगायोगाचे नाहीत,' स्वाभाविक आहेत असें प्रस्तावनाकार म्हणतात. वसुधेचा निशिकांताशीं 'संबंध' येतांना एखाद्या अशाच स्वाभाविक योगायोगाची कवीने योजना केली असती, तर त्या उभयतांच्या सच्छीलाला लांछन लागलें नसतें व त्यांच्या भूमिका अधिक उठावदार वाटल्या असत्या.

### व्यक्तिगत कवितासंग्रह

यंदा प्रकाशांत आलेल्या व्यक्तिगत कवितासंग्रहांची संख्या दहाहून अधिक आहे. 'बुल्बुल्' हा श्रीकृष्ण पोवळे यांच्या कवितांचा तिसरा संग्रह आहे. पोवळ्यांची कविता आत्मकेंद्रित आहे. रात्रीं गुलाबकलिकेच्या कानाशीं लागून आपल्या व्यथेचे विलापरव आलापणाऱ्या बुल्बुलाच्या आवाजांतील 'चित्कार' त्यांच्या वाणींत आहे. जीवन, त्यांतला प्रणय, त्याचा उपभोग, त्याची विफलता, तिच्यामुळें आलेली निराशा, त्या निराशेच्या योगाने वाटणारी नश्वरता आणि पटणारी निरीश्वरता या गोष्टींची या कवितासंग्रहांत अनेकवेळां आवृत्ति झाली आहे. याला कारण कदाचित् कवीचा वरवरचा अनुभव असावा. अजून गहन अशा अनुभूतीचा आस्वाद त्याने घेतला नसावा. 'ही एक माती नि ती एक माती' या दोन मातींतला फरक त्याच्या लक्षांत आलेला दिसत नाही. एक माती निव्वळ मातीच आहे. परंतु दुसऱ्या मातींत साम्राज्यांना उलथून पाडण्याचें 'चैतन्य' आहे. त्यामुळे ती माती पहिल्या मातीसारखी नाही. निरीश्वरतेच्या बेभानपणांत कित्येकदा कवि शाश्वत अशा नैतिक मूल्यांविषयी साशंक होतात. 'नरो वा कुंजरो वा' ही धर्माची मोघम वाणी पूर्णपणें धर्मवाणी नव्हती हें कबूल; पण त्याचें प्रायश्चित्त म्हणून स्वर्गारोहणाच्या वेळीं त्याच्या पायाचा अंगठा गळून पडला इकडे लक्ष नको का? पोवळ्यांच्या अभिव्यक्तींत आणि उक्तींत एक प्रकारचा उत्कट बेछूटपणा आहे. त्यांची भावना प्रांजळ व प्रामाणिक आहे; त्यामुळे 'वादळा' सारखी त्यांची कविता वारंवार वाचावीशी वाटते. मात्र त्यांच्या एकंदर व्यक्तित्वाला व्यवस्थिति येण्यास अजून अवकाश आहे.

'चंद्राचा हट्ट' हें नांव श्रीनिवास खारकर यांच्या कवितासंग्रहाचें आहे. कवीला चंद्राची खूपच आवड व ओढ आहे. खारकरांची बरीचशी कविता नभोवाणी, ध्वनिमुद्रण, बोलपट इत्यादि यांत्रिक कलांकरितां निर्माण झाली आहे. असें असूनसुद्धा तिचें स्वरूप 'हुकमेहुकमी' नाही हें दर्शनीय आहे. लावण्य आणि तारुण्य हे दोन खारकरांच्या प्रेमाचे खास विषय आहेत. हे दोन विषय त्यांनी हळुवार हाताने रंगवले आहेत. या विषयांवरील त्यांच्या बहुतेक कविता नाट्यपर आहेत. त्यांत प्रेमिक आणि प्रेयसी यांच्या विरहापेक्षा मधुरमीलनांचे प्रसंग अधिक आहेत. खारकरांची कविता गेय आहे. त्यांच्या शब्दांत स्वभावतःच सुरेल संगीत आहे. त्यांचीं गीतें कानीं पडतांच Poetry is music in words and music is poetry in sound या सुभाषिताचा प्रत्यय पटतो. खारकरांनी कांही कविता प्रचलित चळवळींवर लिहिल्या आहेत. त्यांच्या बालगीतांत 'वेंच् फुलें वेंच्' हें गीत श्रवणीय आहे. माडगुळकरांच्या 'गीतरामायणा'-च्या धाटणीवर त्यांनी कांही पुराणगीतें रचलीं आहेत. परंतु या गाण्यांचा गोडवा चिरस्थायी वाटत नाही. खारकरांच्या शीर्षक नसलेल्या आरंभींच्या कवितेंत आणि अखेरच्या 'ऋणी' या कवितेंत भावनेचा जो ओलावा व अथांगपणा आढळतो, त्यांचें दर्शन त्यांच्या गीतांत होत नाही. कविता व गीत यांत अंतर आहे. कवितेची ओढ अंतःकरणाच्या दिशेने विशेष असते. परंतु गीताचा पुष्कळसा भर कानांवर असतो.

मा. गो. काटकर यांचा 'पारिजात' हा काव्य-संग्रह याच वर्षी प्रसिद्ध झाला आहे. त्याचा सौम्य सुरभि माझ्या स्मृतिसंपुटांत दरवळत आहे. काटकरांच्या वृत्तींत तारतम्य आहे. त्यामुळे त्यांचे भाव संथ असले, तरी निवांत आहेत; आणि विचार सौम्य असले, तरी रम्य आहेत. मुळांतच शेंडाबुडखा नसणाऱ्या कल्पनेंत ते रंगत नाहीत. परंतु जी कल्पना मुळांत त्यांच्या मनाची पकड घेते, ती मांडतांना त्यांची प्रतिभा अतिशय स्वच्छ व निर्मळ असते. त्यांच्या प्रतिमांना अकारण अस्पष्टपणा व पुसटपणा माहीत नाही. आपण रसिकांसाठी आहों ही आठवण त्यांना आहे. त्यामुळे त्यांच्या कवितेंत क्षुल्लक भावना, क्षुद्र विचार, वेड्या कल्पना आणि वावदूक वाणी यांचा फापटपसारा आढळत नाही. कांही काळापूर्वी 'छन्द' मध्ये मी त्यांची 'दुपार' पाहिली होती, ती एकच कविता या विधानाचें समर्थन करण्यास समर्थ आहे.

'नभ अंकुरलें' हा तुळशी रामजी काजे यांचा कवितासंग्रह आजच्या नवकवितेचा प्रतिनिधि आहे. आज कवितेविषयीं बोलतांना 'आशय' व 'अभिव्यक्ति' या दोन शब्दांचा वापर वारेमाप होत असतो. वस्तुतः कविता ही भावलेखनार्थ आहे. हा भाव आशयाने अधिकाधिक सांद्र होत असतो. आजच्या कवितेंत तो तसा आहे आणि कालच्या कवितेंत तो तसा नव्हता हा व्यर्थ विवाद आहे. आजच्या आणि कालच्या कवितेंत जर कुठे निराळेंपण दिसत असेल तर तें अभिव्यक्तींत दिसतें. आजच्या कवितेंत अभिव्यक्तीचे अनोखे व नवखे आकार-प्रकार आणि आगळे व वेगळे उक्तिविशेष यांचें रमणीय व स्मरणीय प्राचुर्य आढळांत येतें हें नाकारतां येत नाही. त्यामुळे मराठींत नवे नवे भाषिक संप्रदाय व वाक्प्रचार यांची लक्षणीय भर पडत आहे. मात्र कित्येकदा या बाबतींत नवकवि दुसरें टोक गाठत आहेत व काव्य दुर्बोध करीत आहेत. काजे यांच्या कवितेंत निसर्गाचीं नयनरम्य चित्रें आहेत. त्यांचा निसर्ग सचेतन व चेतोहर तर आहेच, परंतु त्याचें शब्द-चित्र काढतांना ते निवडक क्रियापदें व समर्पक विशेषणें अशा अमोघ रीतीने योजतात की तो निव्वळ साकारच होत नाही, तर सजग होतो. वानगी-दाखल पावसाळ्यासाठी आतुरलेल्या व आसावलेल्या उन्हाळ्याचें हें शब्दचित्र पहा :

'ढगाळले आसमंत । लवे विजेची पापणी
किती टाहो फोडोनिया । आळवावे मयूरांनी

वाट पाहून पाहून । ओठ तळ्याचे सुकले
हुरळल्या खडकाचे । बेत उरीं करपले '

परंतु ज्या वेळीं काजे 'अंगारा फासला' किंवा 'कशी करूं धडपड । होईल गे ! बोलवाला' असे चुकीचे प्रयोग करतात, त्या वेळीं कवितेंतील नावीन्याच्या या निदिध्यासाला आणि वेगळ्या अभिव्यक्तीच्या या हव्यासाला थोडाफार पायबंद असावा असें वाटूं लागतें. वस्तुतः अंगारा लावतात आणि राख फासतात. त्याचप्रमाणे बोभाटा होणें वाईट आणि बोलबोला होणें चांगलें. हिंदींत म्हणतात, 'हमारे दोस्तका बोलबाला है और दुष्मनका मुंह काला है.' मात्र काजांची भावना खरी आहे. ती जेव्हा

'मुळींहि न हलायचा । शब्द ओठीं खिळलेला ।
नाहीं अर्थ झरायचा । पापणींत दडलेला ।
कासावीस होऊनिया । तडफडतात प्राण ।
उरलेल्या दिवसांच्या । खांद्यावर विद्ध मान ।'

असे आर्त उद्गार काढते, तेव्हा तिची प्रतीति पटल्याशिवाय राहत नाही.

'पल्लवी' हा कवितासंग्रह नवोदित कवींचा सामुदायिक कवितासंग्रह आहे. त्याचें संपादन सध्या साहित्याच्या क्षितिजावर ठळकपणें चमकत असलेले कवि आरती प्रभु यांनी केलें आहे. त्यांत प्रभु, उपाध्ये, पेडणेकर, भागवत, वैद्य, शिलरे प्रभृति मित्रमैत्रिणींच्या कवितांचा समावेश आहे. यांपैकी आरती प्रभु व अ. ना. पेडणेकर यांच्या कविता निरनिराळ्या नियतकालिकांतून वारंवार नजरेस पडत असतात. या दोघांच्याहि प्रतिभांची प्रभा हळूहळू सर्वत्र पसरत आहे. निसर्ग हा पेडणेकरांचा आवडता विषय आहे. कोकणचा समुद्रकाठ त्यांनी शब्दांत जिताजागता केला आहे. या संग्रहांत आरती प्रभु यांची 'अंतराळ उल्का उल्का' ही कविता सर्वोत्तम आहे. आरती प्रभूंच्या कवितेंत अन्तर्मनांतील जाणीव ही शब्दांत आविष्कृत होण्यासाठी धडपडत असल्याचें दिसतें. त्यांचें संवेदन हें कदाचित् अधिक तीक्ष्ण असेल; परंतु तें शब्दांत आकारास आल्यावर इतरांना जाणवत नाही. असें कां ? का अजून अंतर्मनांतील जाणीव व तीक्ष्ण संवेदन शब्दांकित करतांना त्यांना अनुरूप प्रतिमा, अचूक रंग व अमोघ भाषा सापडत नाही ? अन्य मित्रमैत्रिणींच्या कवितेंत बराचसा भाग अनुकरणाचा आहे. त्याबाबत अनुकरण हा मनुष्यस्वभाव आहे हें लक्षांत घेऊन एवढेंच म्हणतां येईल की, तें इष्ट असावें, भ्रष्ट नसावें.

सुधांशु यांनी आपल्या रसवंतीला 'जलवंती' हें नांव दिलें आहे. हें नांव सहेतुक असावें. कारण या कवितासंग्रहांतील निम्म्याशिम्म्या कविता कृष्णानदीवर आणि तिच्या काठावर व घाटावर आहेत. कवि हे कृष्णातीरावरील औदुंबर क्षेत्राचे रहिवाशी आहेत. त्यामुळे त्या क्षेत्राच्या पवित्र परिसराचें स्तोत्र त्यांनी पुन्हा पुन्हा गाइलें आहे. सुधांशूंची वाणी साधीभोळी आहे. तिने पत्नीप्रेमाचीं आणि अपत्यवात्सल्याचीं गाणीं विपुलतेने आळविलीं आहेत. सुधांशूंचीं कांही गाणीं नाट्यपर आहेत. त्यांत बहुधा स्त्रीच्या मनाचें लेखन आहे. मात्र त्याच त्या भावना, त्याच त्या कल्पना व त्याच त्या रचना यांच्या आवर्तनांमुळे सुधांशूंच्या कवितेंत बऱ्याच प्रमाणांत तोच-तो-पणा आला आहे. त्यांतहि 'कधी दिनांतीं' सारखी एखादी कविता अंतःकरणास चाटून जाते :—

'कधीं दिनांतीं कातरवेळीं । सारुनि पडदा आभासाचा
हळूच पाहतो वुजऱ्या नयनीं । सलता काटा गतगोष्टींचा

कधीं दिनांतीं कातरवेळीं । कृष्णेच्या तीरावर बसुनी
दडपुनि गेल्या व्यथित मनाची । तिला सांगतों करुण कहाणी.'

' स्नेहदीप ' हा वसंतराव बल्लाळ या दिवंगत कवीचा कवितासंग्रह असून त्यांत भक्ति, प्रीति आणि अनुरक्ति यांच्या भावच्छटांची रंगत आहे. या कविता १९३५ ते १९४५ या दशकांतल्या आहेत. यांशिवाय प्रताप यांचा ' वसुंधरा ', काशीताई नाटेकर यांचा ' निवांत ' आणि सरलाताई देवधर यांचा ' घोडागाडीवाला ' हे कवितासंग्रह यंदा प्रसिद्ध झाले आहेत. यांपैकी दुसऱ्या दोन संग्रहांत स्त्रियांच्या कोमल भावनांचा आणि त्यांच्या टिकाणच्या प्रेमळ वत्सलतेचा मनोहर आविष्कार झाला आहे.

### शाहिरी कविता

यंदा ' माझी मान ताठ आहे ' आणि ' कलश ' हे दोन शरद् मुठे व अमरशेख या शाहिरांच्या शायरीचे दीवाण प्रसिद्ध झाले आहेत. मुठ्यांनी आपल्या एका लोकप्रिय कवितेचें नांवच कवितासंग्रहाला बहाल केलें आहे. त्या कवितेंतला उपहास बहारदार आहे. भर्या हळकुंडाने पिवळ्या होणाऱ्या तथाकथित देशसेवकाची त्यांत टर आहे. मुठ्यांची बाकीची कविता संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीची आहे. अर्थात् तिचें स्वरूप नैमित्तिक आहे. तेव्हा सध्याचें आंदोलन थांबलें म्हणजे तिला केवळ ऐतिहासिक महत्त्व राहील हें उघड आहे. मुठ्यांच्या थोड्या आत्मपर कविता आहेत. त्यांत त्यांची शाहिरी तडफ असल्यामुळे त्याहि आकर्षक उतरल्या आहेत. मुठ्यांच्या मानाने अमरशेख यांचें स्थान फार उंच आहे. अमरशेखांच्या संयुक्त महाराष्ट्र, गोवा छोडो, हिंदी संघराज्य, महात्माजींचें बलिदान इत्यादि कविता प्रचलित राजकीय विषयांवर असल्या, तरी त्यांच्या एकूण शायरीचा पाया भरभक्कम अशा ' माणुसकी'-वरच्या श्रद्धेंत आहेत. ते जन्माने ' उमर ' असले, तरी कर्माने ' अमर ' आहेत. त्यांची कुळी ' शेख 'ची आहे. परंतु 'खादिमां'च्या एकमेव मिरासदारीचे ते दुश्मन असून भिश्ती व बबर्जी यांच्या तरक्कीचे ते दोस्त आहेत. आज त्यांनी साम्राज्यशाही, सामंतशाही आणि पुंजीशाही यांच्या विरुद्ध शेतकरी आणि कामकरी यांचा विळा व घण हातांत उचलला आहे. त्यांना आकुंचित अप्पलपोटा जातीयतावाद अमान्य आहे. त्यांना स्वतःला ' माणूस ' म्हणून जगावयाचें आहे, आणि जगालाहि जगवावयाचें आणि तगवावयाचें आहे. यासंबंधी आपली इच्छा व्यक्त करतांना ते उद्गारतात :

' तो मरतो हें पाहुनसुद्धां । धडपडतो मी जगण्यासाठीं
मरण हवें पण क्रमाक्रमाने । कुत्र्याच्या मौतीने नाहीं
मौतीने वाघाच्या नाहीं । सरळ नि साधा माणुस म्हणुनी.
मरण बकुळीच्या फुलाप्रमाणे । अगदीं नाजुक सहजच यावें
निर्माल्य न होतां सुकुनीही— । देउनि सुगंध जन रिझवावे. '

'माणुसकी'वरील या अत्युत्कट व बळकट श्रद्धेमुळे त्यांनी ' पुढील युद्धाची भाषा बोलणाऱ्या साम्राज्यवाद्यांना ' व ' हैड्रोजन बॉंब ' घडवणाऱ्या वैज्ञानिकांना कडक इशारा दिला आहे. अमरशेखांची वाणी दमदार आणि जोमदार आहे. तिच्यांत रक्तांतील रग आणि आतड्यांतला पीळ आहे. ती कानीं पडतांच शरीरावर रोमांच थराऱ्न उभे राहतात. पुन्हा ती संताप आणि शिव्याशाप यांपासून मुक्त आहे हें विशेष आहे. ती उपहास व उपरोध यांच्याकडे वळत नाही. याचें कारण तिला सच्चपणा प्यार आहे. तिची अव्यभिचारी जीवनावर निष्ठा आहे. म्हणूनच ती 'तृप्ती'सारखी कौटुंबिक प्रीतीचीं आणि 'जलकमला'सारखीं वत्सलतेचीं गाणीं

गाऊं शकते. 'कलशां'तील कवितेकवितेंत अमरशेखांनी आपल्या कणखर पण तितक्याच कोमल काळजाचे तुकडे तुकडे काढून ठेवले आहेत. आत्मनिवेदन करतांना ते म्हणतात की,

' पुष्पावतीस पाणी नाहीं । बालेघाटीं काळी आई
यांच्या उदरीं बाल्य उमललें । निर्जल म्हणुनी असें खुरटलें. '

परंतु त्यांना अभिमानाने सांगावेसें वाटतें की, " अमरशेख ! तुमच्या बार्शीच्या भागांत पाणी नसेल, पण तुमच्यांत आणि तुमच्या कवितेंत तें भरपूर आहे. तें आणखी पिण्यास मिळावें म्हणून रसिक तृषार्त आहेत. "

## विनोदी कविता

विनोदी कवितांच्या संग्रहांत यंदा बाबुलनाथ यांच्या 'धुंवाधारे'ने आणि अत्रे व वांदेकर या जोडगोळीच्या 'पंचगव्या'ने 'वजन'दार भर पडली आहे. बाबुलनाथांच्या धुंवाधारेंतील सर्वच कविता ताज्या नाहीत. कांही यापूर्वीं त्यांच्या निरनिराळ्या कवितासंग्रहांतून प्रसिद्धि पावलेल्या आहेत. बाबुलनाथांच्या कवितेंत उपरोध फारसा आढळत नाही. परंतु विडंबनें व उपहास यांची मात्र रेलचेल आहे. विडंबनपर कविता ही 'प्रकृती'ची ' विकृति ' असते. त्यासाठीं बाबुलनाथांनी ज्या कवितांचीं विडंबनें केलीं आहेत, त्या मुळांतून वाचल्या पाहिजेत. त्याशिवाय त्यांच्यांतील विनोदाची खुमारी कळणार नाही. वस्तुतः विडंबनांत मूळ कवितेंतील विषयाचेंहि विडंबन हवें. बाबुलनाथांनी तें सर्वत्र तसें केलेलें नाही. मात्र कांही कवींच्या कांही विशिष्ट लकबा, खोड्या व आवडी यांची बेमालूम नक्कल केली आहे. बाबुलनाथांचा उपहास समाजाच्या अथवा व्यक्तींच्या वर्तनांतील विसंगति, सोंग, ढोंग, हव्यास, छंद, टूम, अतिरेक व आचरटपणा यांवर आधारला आहे. यासाठी त्यांनी दारूबंदी, संततिनियमन, मुलींची नौकरी, नटीचा व्यवसाय इत्यादि विषय हाताळले आहेत. बाबुलनाथांच्या ' बौद्धिक भूक'सारख्या क्वचित् कांही कविता व्यक्तिगत टीकेच्या स्वरूपाच्या वाटतात, त्यामुळे विनोद निर्भेळ व निर्मळ राहत नाही. ' उंच झालों म्हणून ' किंवा ' मी आणि मिशा ' यांसारख्या त्यांच्या कल्पित कविता मात्र सर्वांनाच हसवणाऱ्या आहेत. बाबुलनाथांनी विनोदाचा उपयोग सुधारणेचें साधन म्हणून मोठ्या कलाकुशलतेने केला आहे. समाजाच्या व व्यक्तीच्या व्यंगावर बोट ठेवतांना त्यांनी आपला खेळकर व हसकर स्वभाव सोडलेला नाही. निर्मळ सहानुभूतीपर विनोदाचा नमुना म्हणून त्यांची ' वांझ ' ही कविता उल्लेखनीय आहे. त्यांत अंगाऱ्याधुपाऱ्यासारख्या खुळचट समजुतींची थट्टा आहे. पण त्यांच्या नादीं लागलेल्या दुर्दैवी ' वांझे 'बद्दल मात्र वाचकाला सहकंप वाटतो. इंग्रजींत टॉमस हूडच्या उपहासिनांची वाहवा आहे. याचें कारण त्याच्या उपहासाचा रोख विषयावर असतो, व्यक्तीवर नसतो; आणि उपहासाचा विषय झालेल्या व्यक्तीबद्दल त्याच्या कवितेंत सहानुभव असतो.

अत्रे व वांदेकर या जोडगोळीच्या ' पंचगव्यां 'तील विनोदाचें स्वरूप थोडें वेगळें आहे. तो विनोद औपरोधिक ( satirical ) आहे. प्रतिपक्षाचा आणि त्यांच्या मतांचा त्यांत परिहास व उपहास आहे. प्रमादांचा स्फोट करणें व खुळचटपणाला पायबंद घालणें हे औपरोधिकेचे उद्देश असतात. परंतु पंचगव्यांतील विनोदाची मदार प्रतिपक्षांतील व्यक्तींवर व त्यांच्या कुचेष्टेवर विशेष आहे. औपरोधिका ( satire ) म्हणजे कांही टवाळकी किंवा कुटाळकी नाही. वाङ्मयाचा तो एक मान्यवर प्रकार आहे. त्यांत विनोद असला, तरी तो मार्मिक व विदग्ध हवा. प्रतिपक्षाविषयीच्या आदरभावनेला त्यांत धक्का लागतां कामा नये. ' वाह्वा वाह्वा नेहरू हा ' हा विनोद बालिश आहे. देव, हिरे, गाळगीळ व चव्हाण हीं

माणसें मराठी आहेत व त्यांचींहि मनें मराठी आहेत. आपल्याप्रमाणेच त्यांनाहि महाराष्ट्राविषयी अभिमान व प्रेम आहे. मग वेळीं-अवेळीं दाढी, लुंगी इत्यादि त्यांच्या वेषभूषांची किंवा त्यांच्या नांवांवर हलक्यासलक्या कोट्या करून ह्या पिकविण्याची काय गरज ? अशा कुचेष्टेने प्रतिष्ठा वाढते हा अपसमज आहे व उद्देश सिद्धीला जातो ही कल्पना व्यर्थ आहे. हा विनोद वाचणारा वाचकवर्ग किंवा ऐकणारा श्रोतृवर्ग हा त्याला केवळ 'घडीभर मौज' म्हणून लेखतो. त्यामुळे त्याच्या विचारांत परिवर्तन घडत नाहीं. पंचगव्याचें पावित्र्य जर कायम ठेवावयाचें असेल, तर तें असें दर आठवड्याला प्राशन करून राहणार नाही. त्यासाठी श्रावणीसारखा एखादा पवित्र दिवसच बरा.

## भाषांतरित कविता

भाषांतरित कवितांबाबतची यंदाची एक लक्षणीय बाब अशी की, सावरकरांच्या माझें मृत्युपत्र, सागरास, वहिनींस पत्र इत्यादि मराठी कवितांचा ग. बा. पळसुले यांनीं 'अग्निजा' या नांवानें संस्कृत अनुवाद केला आहे. 'अग्निजा' म्हणजे ठिणगी. अर्थात्, हें नांव सावरकरांच्या कवितेला अनुरूपच आहे. या अनुवादामुळे अन्यप्रांतीयांना मराठींतील राष्ट्रीय कविता कोणत्या तोलाची व मोलाची आहे याची ओळख पटेल. अनिलांच्या 'भग्न मूर्ती'चें हिन्दी भाषांतर माचवे यांनी केलें आहे. हीं दोन्ही भाषांतरें मराठी कवितांचीं असल्यामुळे व तीं महाराष्ट्राबाहेर मराठी कवितेच्या वैभवाचा प्रसार करणारीं असल्यामुळे प्रस्तुत आढाव्यांत बसण्यास प्रत्यवाय नाहीं.

सबनीस यांनी संस्कृतांतून 'मेघदूता'चें पुरवणी भाषांतर मराठींत आणलें आहे. त्याचप्रमाणे विंझे यांनी 'पाणपोई'चा दुसरा खंड इंग्रजींतून आणला असून या आढाव्याच्या समीक्षकाने 'कुसुम-करंडक' या संग्रहांत कांही विख्यात इंग्रजी शालेय कवितांचीं भाषांतरें एकत्रित केलीं आहेत. कालेलकरांनी 'रवींद्र-मनन' या ग्रंथांत रविबाबूंच्या कांही निवडक गीतांचीं भाषांतरें संगृहीत केलीं आहेत. तीं मूळ बंगाली गीतांवरून केलीं असल्यामुळे विशेष विश्वसनीय आहेत. सेतुमाधव पगडी यांनी 'मिर्झा गालिब'च्या कांही उर्दू गज्जलांचे अनुवाद पेश केले आहेत. गालिब हा वास्तविक फारशीचा शायर. परंतु पुढे त्यान उर्दूला आपणावलें. त्याच्या शायरींत शृंगाराइतकेंच तत्त्वज्ञानालाहि स्थान आहे. कालेलकर व पगडी यांच्या प्रयत्नांमुळे मराठी रसिकांचा रुचिपालट होणार असून अन्यभाषाभगिनींच्या त्यांच्या अभ्यासास चालना मिळणार आहे.

## संकलित, संशोधित व पुनर्मुद्रित प्राचीन कविता

'मराठीची माया' या प्रकाशनांत नांदापूरकर यांनीं मराठवाड्यांत परंपरेने प्रचलित असणाऱ्या लोकगीतांचें संकलन केलें आहे. हीं लोकगीतें म्हणजे निसर्गाच्या कुशींत लोळणाऱ्या लतिकेचीं मनोहर पुष्पें आहेत. त्यांच्यांत आमच्या खेड्यापाड्यांचा इतिहास, संस्कृति आणि आचारविचार इत्यादिकांचें प्रतिबिंब पडलें आहे. अलीकडे अनेक कवि व कवयित्री या पारंपरिक गीतांचें अनुकरण करतांना दिसतात. त्यावरून त्या गीतांचें महत्त्व लक्षांत येईल. यंदा 'ज्ञानेश्वरीचा दुसरा अध्याय,' 'योगवासिष्ठ,' 'नामदेवरायांच्या अभंगांचा गाथा,' 'रामदासांचीं भजनें' व 'हरिवरदा' हे प्राचीन ग्रंथ पुनर्मुद्रित झाले आहेत. संतांचें हें साहित्य विनोबा, तुळपुळे, कर्वे, रिसबूड इत्यादिकांना संपादन करावें असें वाटतें आणि आज अनेक शतकांच्या अवधीनंतरहि त्यांचें पुन्हा पुन्हा मुद्रण होत आहे यावरून त्याचें अनन्यसाधारणत्व जोखतां येईल. मराठी कवितेचे हे सतत वाढत जाणारे महानिधि आहेत. त्यांचा जों जों वेंच होत आहे तों तों त्यांची संपन्नता अधिकाधिक वृद्धिंगत होत आहे.

## नियतकालिकांतील कविता

या वर्षी ' काव्यकुंज ' व ' रूपगंधा ' हीं दोन केवळ कवितेला वाहिलेलीं नियतकालिकें अवतरलीं आहेत. त्यांच्यांतील कविता ठराविक ठशाची असून बराचसा अंश अर्थशून्य लेखनाचा व अंधानुकरणाचा आहे. सत्यकथा व छंद या दोन नियतकालिकांनीं नवकवितेची मोठ्या आस्थेने व सातत्याने जोपासना केली आहे. त्यामुळे त्यांच्या अंकांतून अनेक उल्लेखनीय कविता दृष्टीस पडतात. परंतु त्या सर्वांचा प्रपंच करण्यास येथे स्थलावकाश नाही. याशिवाय साधना, वाङ्मयशोभा, वसंत, अनुराधा इत्यादिकांनीहि कवितेला यथास्थल अवसर दिला आहे. परंतु हीं सर्व नियतकालिकें एकत्रित हाताशीं नसल्यामुळे व एखाद्या कवीचें त्याच्या एखाद्या दुसऱ्या कवितेवरून प्रतिभासामर्थ्य अजमावणें न्यायाचें व नीतीचें नसल्यामुळे कांही कवि, कांही कविता व कमीअधिक मतप्रदर्शन येवढ्यावरच सध्या संतोष मानणें भाग आहे. पु. शि. रेगे यांच्या ' मन ' व ' साधना ' या कविता, ग्रेस यांच्या ' तेरा कविता ', आरती प्रभु यांची ' झाडें वाकलीं ', इंदिरा यांची ' रंगबावरी ', बापट यांची ' उमा ', पाडगांवकरांची ' गेलें आभाळ संपून ', कांत यांची ' यक्ष ', बोरकर यांची ' वृष्टि ' इत्यादि कविता लक्षणीय आहेत. ' अशा रेषारंगामध्यें ' ही करंदीकरांची कविता तर सर्वोत्कृष्ट आहे. नवकवितेच्या समर्थकांकडून नवकविता ही पूर्वग्रहविमुक्त असावी. तिच्यांतला भाव, विचार अथवा स्पंदन व्यक्तिविशेषाचें असावें आणि तेंहि विवक्षित क्षणाचें असावें. त्याचें चित्रण ज्या चित्रांनी करावयाचें, तीं चित्रेंहि नवीन असावींत; आणि या क्रमाने जो आशययुक्त आकृतिबंध तयार होईल तो असंपृक्त असावा अशा प्रकारचा कोटिक्रम करण्यांत येत असतो. परंतु कविता निर्माण करणारें मन हें संस्कारक्षम असतें; त्याच्यावर भोवतालच्या वातावरणाचा व परिस्थितीचा प्रभाव पडत असतो; ज्या क्षणास त्यास एखादें संवेदन होतें, तोच क्षण पुढच्या क्षणास अंतर्धान पावत असतो. तो क्षण चित्रित करतांना त्याला जीं चित्रें सुचतात अथवा स्फुरतात, तीं अर्थातच त्याच्या परिचयांतलीं व पाहण्यांतलीं असतात; आणि म्हणूनच तीं रसिकांना रिझवूं शकतात या वस्तुस्थितीकडे ते लक्ष देत नाहीत. अलीकडली बरीचशी कविता मूळ वृत्तीला व विषयवस्तूला विसरून अथवा बाजूला ठेवून लिहिली जात आहे. त्यामुळे तिच्यांत साध्यापेक्षा रंग-रूप, शब्द-नाद, गंध-स्पंद, रस-रुचि व स्पर्श-संवेदन इत्यादिकांचाच फार बडिवार माजवलेला दिसतो. हीं साधनें साध्याला पोषक आहेत, आवश्यक नाहीत !

## उपसंहार

अठ्ठावनमध्ये अनेक कविता प्रदीर्घ लिहिल्या गेल्या आहेत. एक खंडकाव्यहि जन्माला आलें आहे. तेव्हा हळूहळू एका शब्दब्रह्माच्या बालरूपाकडून मराठी कविता तिच्या विराट्-स्वरूपाकडे वळत आहे असें म्हणण्यास हरकत नाही. इतके दिवस मराठी कविता स्वतःच्या भोवतालच्या परिघांतच प्रदक्षिणा घालत होती; पण आता संस्कृत व इंग्रजीबरोबर तिची दृष्टि उर्दू, बंगाली, चिनी इत्यादि क्षेत्रांकडेहि झेपावत आहे हें तिच्या विकासाच्या दृष्टीने सुचिन्हच आहे. नवकवितेचा पहिलावहिला बहर आता ओसरला आहे, तिच्यांतील अनुभवांच्या पातळीचा, प्रगल्भवृत्तिसंगतींचा आणि विषयवस्तूंचा आता फेरविचार होत आहे. रंग-रेखा, शब्द-नाद किंवा थाट-थाट म्हणजे कांही कवितेचें सारसर्वस्व नाही हें आता विचारवंतांच्या लक्षांत येऊं लागलें आहे. कवितेचा उपयोग प्रचार व प्रसार यासाठीहि होत आहे. कविता एखाद्याचें साध्य असेल, तर दुसऱ्याची ती साधन होऊं शकत नाही असें थोडेंच ? कविता उदंड माजत आहे यासाठी रुखरुखण्याचें कारण काय ? Survival of the fittest हा निसर्गाचा न्याय आहे. तो चुकणार नाही ! ● ● ●

श्री. पण्डित शेटे, एम्. ए.

# लघुकथा

एकोणीसशे अठ्ठावन्न सालांत प्रसिद्ध झालेल्या कथांचा हा आढावा आहे. या समीक्षणाला अनेक मर्यादा पडलेल्या असण्याची शक्यता आधीच नमूद केलेली बरी. प्रतिवर्षी लघुकथांची जी अफाट निपज होते, ती लक्षांत घेतां समीक्षकाची शक्ति मर्यादित असल्याचें ध्यानांत येईल. तसेंच समीक्षकाच्या दृष्टिकोनाबाबतहि मतभेद झाल्यास मर्यादेची अपरिहार्यता जाणवेल. कथा या वाङ्मयप्रकाराची लांबीरुंदी लक्षांत घेतां एखादी कथा उद्‌धृत करून तिचें सांगोपांग विश्लेषण करणें अशक्य आहे हें उघड आहे. त्यामुळे कथासमीक्षकापुढे नुसतेंच विश्लेषण व निष्कर्ष अशी परिस्थिति निर्माण होते.

प्रस्तुत समीक्षणाचा प्रमुख आधार '५८ सालांत प्रसिद्ध झालेले लघुकथासंग्रह होत. तसेंच '५८ सालीं नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या कथांचा विचारहि ( शक्यतोंवर ) केलेला आहे. या सामग्रीच्या अनुषंगाने सध्याच्या कथेंत आढळणारे ठळक प्रवाह आणि प्रवृत्ति यांचें विवेचन केलें आहे व त्यांनाच या समीक्षणांत प्राधान्य दिलें गेलें आहे. कथासंग्रहांची सूची सोबत जोडली आहे. सूचीमध्ये नमूद असलेले अनुवाद ( उघड कारणांकरिता ) विचारांत घेतले नाहीत. तरीपण कथासाहित्याला नवी दिशा दाखवूं शकतील असे अनुवाद जरूर विचारांत घ्यावे. 'सत्यकथे'तून प्रसिद्ध होत असलेले कॅरेल चॅपेकचे अनुवाद हे अशांपैकी. परंतु प्रस्तुत समीक्षणाच्या कालमर्यादेंत ते बसत नाहीत तसेंच कुसुमावतींचा ' दीपमाळ ' व गंगाधर गाडगीळांच्या ' गाडगीळांच्या कथा ' हे संग्रह विचारांत घेतले नाहीत. लघुकथावाङ्मयाच्या अखंड स्रोतांतील विकासाचे टप्पे म्हणून यांना महत्त्व असलें, तरी हीं पूर्वीच्या संग्रहांतील कथांची कांही विशिष्ट हेतूने केलेलीं पुनर्मुद्रणें असल्याने त्यांचा विचार करण्याचें कारण नाही.

मराठी कथेच्या दृष्टीने अठ्ठावन्न साल हें महत्त्वाचें ठरलें. प्रा. वा. ल. कुलकर्णी यांनी मालवण येथील साहित्यसंमेलनांत आजच्या कथेवर गतसालीं केलेलें भाषण वादळ उठविणारें ठरलें. नवकथेचे समीक्षक आता अंतर्मुख होऊन आजच्या कथावाङ्मयांतील त्रुटींचा विचार करूं लागले असल्याचें या घटनेवरून स्पष्ट झालें. गंगाधर गाडगीळांच्या कथेचें सांगोपांग विश्लेषण करणारे माधव आचवलांचे लेख या वर्षीच प्रसिद्ध झाले. गाडगीळांच्या कथेचे, कथेंतील घटक आणि त्यांचे परस्परसापेक्ष संबंध, लक्षांत घेऊन आचवलांनी जें विश्लेषण केलें, तें नवकथेच्या अभ्यासाला एक वेगळी दिशा दाखविणारें ठरेल. कुसुमावतींच्या संग्रहाला श्री. खांडेकरांनी लिहिलेली प्रस्तावना व वरील दोन्ही समीक्षकांचे लेख या तीनहि टीका सामग्र्याने वाचल्या असतां कथावाङ्मयाच्या आणि त्याचबरोबर कथेच्या समीक्षेच्या स्वरूपांत कसा फरक पडत गेला हें स्पष्ट होतें.

प्रस्तुत सालांतील कथेचा विचार करतांना सत्यकथेच्या रौप्यमहोत्सवी चढाओढींत पारितोषिक मिळविलेल्या शंकर पाटलांची कथा प्रथम डोळ्यापुढे येते. पिंडाने किंवा बाह्य वा अन्तःस्वरूपानेहि नव्हे, तर कलाविषयक जाणिवेने गंगाधर गाडगीळांना जवळीक करणाऱ्या या लेखकाच्या कथेची पृथगात्मता रचनाविषयक साक्षेपांत, प्रयोगक्षम वृत्तींत आणि कलात्मतेच्या प्रगल्भ जाणिवेंत आहे. या वैशिष्ट्यांच्या व्याप्तींत उत्कृष्ट कथा येते असें नाही. किंबहुना उत्कृष्ट कथा या कसोट्यांच्या परिघाला व्यापूनहि अखेर उरतेच. असें असलें तरी उत्कृष्ट कथेच्या दिशेने वाटचाल करायला मदत करणारीं हीं वैशिष्ट्यें आहेत. प्रयोगक्षम वृत्तीचा आविष्कार करणाऱ्या ' वळीव ', ' पोर ' व ' पानगळ ' या श्री० पाटील यांच्या कथा या दृष्टीने लक्षणीय आहेत व त्यांचीं वैशिष्ट्यें ध्यानांत घेणें अगत्याचें ठरेल.

**वळीव**

मान लुकलुक हलणाऱ्या तात्या देसाईची विजेबद्दलची भीति ही ' वळीव ' या कथेची कथावस्तु.

( १ ) ही भीति आणि वळवाच्या पावसांत कडाडणारी वीज हे दोन परस्परसंबद्ध असे घटक आहेत; किंबहुना दुसऱ्या घटकावर पहिल्याचें अस्तित्व अवलंबून आहे. त्यामुळे दुसरी घटना जितकी प्रभावीपणें मांडली जाईल तितकी ही भीति अधिक परिणामकारक रीतीने जाणवेल. या दृष्टीने पाहतां या कथेंत आलेला निसर्ग केवढा परिणामकारी आहे हें पाहावें.

( २ ) विजेची ही भीति मरणाशीं संबंधित आहे. म्हातारा तात्याबा मरणाच्या दिशेने वाटचाल करतो आहे. त्याचें मन आधीच हाबकलें आहे. कथेच्या सुरुवातीला एका प्रसंगांत तात्याचें हें भय सूचित झालें आहे.

( ३ ) या भयाला दचकविणारें स्वरूप येतें वादळाच्या वेळीं. ' खोपीचा कूड वाजू लागला, खोप गदगदा हलूं लागली ! आणि त्याच वेळीं ... पारवाडांत खोवलेली कुऱ्हाड निसटायच्या बेताला आली होती. ' खोप गदगदा हालणें किंवा कुऱ्हाड निसटणें या गोष्टी वादळांतील अपरिहार्य घटना होत. पण त्याच वेळीं त्या तीव्र परिणामकारक ( Concentrated ) प्रतीकें होऊन जातात.

गदगदा हलणारी कोप → म्हाताऱ्या तात्याबाची जीर्ण कुडी
पारवाडांतील कुऱ्हाड → टांगता मृत्यु

आणि शेवटीं सबंध वादळच प्रतीकात्मक होऊन जातें. या गोष्टींकडे थोडें अधिक लक्ष द्यावें, अशा त्या आहेत. वास्तविक या गोष्टी [ थोड्या स्पष्टपणें ] सूचित करण्याचा मोह होऊन प्रतिमास्वरूपांत वापरल्या जाण्याचा संभव होता. कदाचित् निवेदनाच्या ओघापासून या प्रतिमा आपोआप वेगळ्या पडल्या असत्या. पण इथे घडतें तें अधिक परिणामकारक. साध्या निवेदनाला प्रतीकात्म स्वरूप येत जातें. त्यामुळे हीं प्रतीकें सांकेतिक प्रतीकांपेक्षा अधिक जिवंत, अर्थपूर्ण व ' स्वतंत्र ' वाटतात.

( ४ ) तात्याबाला येणाऱ्या ' उमाळ्यां'तून त्याची विजेबद्दलची भीति, त्याचें उतारवय आणि बायकोचें प्रेम यांच्या सूचना पाटलांनी दिल्या आहेत. कोपींत बसलेल्या तात्याबाला विशिष्ट क्षणीं बायकोचें बोलणें आठवतें. त्या ' आठवणी ' इटॅलिक्सचा उपयोग करून पाटलांनी टाकल्या आहेत. ' त्याला वाटलं, ' ' त्याला आठवलं ' या पूर्वीच्या निवेदनाच्या पद्धतीला, निवेदनाच्या ओघाशीं अधिक स्वाभाविक एकरूपता साधण्याच्या दृष्टीने इटॅलिक्सच्या वापरांतून अपरिहार्य रूप दिलें गेलें. 'वळीव'मध्ये या 'आठवणी' निवेदनाच्या ओघांत मुळीच खंड पडूं नये या दृष्टीने इटॅलिक्सचा वापर करून सांगितल्या आहेत. परंतु इटॅलिक्सचा हा वापर एरवी समर्थनीय ठरेलच असें नाही. कारण निवेदनाला एकात्मता व गति लाभत असेल तर त्या ' प्रयोगा'चें साफल्य जाणवेल. एरवी कुठल्याहि प्रयोगाला स्वतंत्र असें मूल्य नसतें हें आपण जाणतोंच.

( ५ ) असें असूनहि या कथेंत कांहीतरी न्यून आहे असें सारखें जाणवतें. हें न्यून कथेंतील प्रभावी निसर्गातच आहे. वादळ व तात्याबाची भीति हीं पुढे इतकीं एकात्म व्हावयास हवीं होतीं की शेवटीं तात्याबाच्या मनांतील भीतीचें भयाच्या वादळांत परिवर्तन व्हावयास हवें होतें. असें झालें असतें, तर कथेला पूर्ववर्णित वादळाचा विराटपणा लाभला असता. पण कथेंतील प्रभावी निसर्गाने भीतीला क्षुद्र करून टाकलें. पाटलांच्या ' प्रतीक्षे'सारख्या उत्कृष्ट लेखन झालेल्या कथेंत हाच दोष जाणवतो. ज्या उत्कट प्रेमांतून ही प्रतीक्षा निर्माण

होते, त्या प्रेमाचा संदर्भ इतका पुसट झाला आहे व प्रतीक्षेच्या क्रियेवर लेखकाचें लक्ष इतकें केन्द्रीभूत झालें आहे की, शेवटीं प्रतीक्षेला अर्थ येतो अक्षरशः ताटकळणें या क्रियेचा. कथेतील रचनाविषयक जागरूकतेचा हा परिणाम आहे.

( ६ ) ज्या रचनागत तर्कशक्तीच्या आधिक्याने 'वळीव'मध्ये निसर्गाला इतक्या कटाक्षाने केन्द्रीभूत केलें गेलें, तिच्यांतील बौद्धिक प्रक्रियेची जाणीव आणखी एका ठिकाणीं होते. 'वळीव'मधील हीं दोन वाक्यें पहा.

'डेरेदार झाडं वाऱ्यानं ओणवीं होऊन भुईला नाकं घाशीत होतीं'

'झालं की वय आता, नाक भुईला घासायला लागलं.'

भुईला नाक घासण्याच्या क्रियेने लेखकाचें निवेदन व तात्याबाचा उमाळा हीं सफाईने जोडलीं गेलीं आहेत. पण त्यांतील बौद्धिक कसब उघड आहे.

'पोर' कथेंत वापरल्या गेलेल्या प्रतीमात्म ॲल्यूजन्स याच प्रकारच्या आहेत. इटॅलिक्स-मध्यें दिलेल्या या ॲल्यूजन्स सखुबाची मनःस्थिति व यमुनेचा पूर यांचा संबंध जोडतात व पर्यायाने सखुबाच्या मनःस्थितीला अधिक गहिरें, परिणामकारक रूप देण्याचा प्रयत्न करतात. पण या ॲल्यूजन्स कथेच्या ओघांत अपरिहार्यत्वाने येत नाहीत, त्यांच्या येण्यांत उपरेपणा आहे. विशिष्ट मनःस्थितींतील खळबळ परिणामकारक रीतीने सांगण्याकरिता असा उपरा घटक वापरणें, हें लेखनांतील कमकुवतपणाचें निदर्शक आहे.

पाटलांच्या आजच्या कथेची प्रवृत्ति भावना, भाववृत्ति, भावनांचे स्फोट, वातावरण या गोष्टी रेखाटण्याकडे आहे. त्यांच्या अनुभवांना ज्या प्रमाणांत खोली लाभेल, त्या प्रमाणांत त्यांचे तंत्रविषयक अर्जित परिणामकारी ठरेल.

पाटलांच्या कथेंत तंत्राचा वापर ज्या सांक्षेपाने व सूक्ष्मत्वाने केला गेल्याचें आपण पाहिलें, त्या सूक्ष्मत्वाने तो सर्वत्रच केला जात नाही. आजच्या बऱ्याचशा कथा कांही विशिष्ट संकेतांना बळी पडत आहेत आणि त्यांना एक ठरीव स्वरूप प्राप्त होऊं लागलें आहे. अनुभवांतील रसरशीतपणाचा अभाव हें एक कारण या प्रकारामागे आहे असें म्हणतां येईल. कांही संकेतांची छाप नुसत्या लेखनपद्धतीवरच पडली आहे असें नव्हे. अनुभवांना आकार देण्याच्या प्रक्रियेंत देखील एकप्रकारचा एकजुटीपणा येऊ लागला आहे. भावनिक प्रक्रियांचे ठराविक आडाखे आता रूढ होऊं लागले आहेत. त्यामुळे कथेंत नुसतेंच कसब जाणवतें असें नव्हे, तर कळत नकळत कथावस्तूशीं अप्रामाणिकपणा होत असल्याचेंहि दिसतें. आजच्या कांही लेखकांत कलात्मतेची जाणीव जरूर आढळते; पण तिचें स्वरूप बौद्धिक आहे. त्यामुळे कथालेखनाचे आडाखे व आडाख्यांतून ठराविक पद्धतीने बेतलेली कथा असा प्रकार आढळतो. भावनांची आवर्तनें रंगवत रंगवत भावनेचा स्फोट होणाऱ्या एखाद्या क्रियेंत कथेची अखेरी साधावयाची ही एक बरीच रूढ असलेली लकब. कांही कथांचे हे शेवट पाहा.

( १ ) आणि एकाएकीं ती ऊर फुटून रडूं लागली. असहायपणें. आणि रडतां रडतां सारं शरीर गदगदून म्हणाली,

"मला जगावंसं वाटतं रे ... संसार करावासा वाटतो ... तुझा संसार करावासा वाटतो..." (पुढे फक्त दोन ओळी आहेत). —'सुमति' – वि. ज. बोरकर.

( २ ) घरीं आल्यावर मी भराभरा दिवे लावतो. भिंतीवरलीं चित्रं पुन्हा रंग धरतच नाही–आमचा फोटो स्पष्टच होत नाही! —'इंद्रायणी'– शं. ना. नवरे.

मनःस्थिति सूचित करण्याकरिता टाकलेलीं अखेरचीं दोन वाक्यें अभिव्यक्तींत देखील प्रकारचा यांत्रिकपणा कसा येत चालला आहे, हें दाखवितात.

( ३ ) मान वर करून सखानें तें सारें पाहिलें आणि चिखलांत बोटें रुतवून तो ढसा-ढसा रडूं लागला. —' वादळ ' – रणजित देसाई.

उदाहरणादाखल वर निर्देशिलेले हे शेवट पुरेसे आहेत.

' वादळ ' या रणजित देसाईंच्या कथेचें येथे थोडें अधिक विश्लेषण करण्याचें योजलें आहे. या कमकुवत कथेंत सध्यांचे बरेच संकेत आढळतात म्हणून हें विश्लेषण आवश्यक.

कथावस्तु : सखा वादळ येईल या भीतीने नांगरट घाईने करीत असतो. इतक्यांत वादळ होतें व सखाच्या मनांतील उद्वेग, राग, भीति, चीड आदि भावनांचा स्फोट होऊन तो रडूं लागतो. म्हणजेच सखाच्या मनावर पडलेले अनेक ताण व त्यांच्या एकत्रित परिणामाने झालेला स्फोट ही कथा.

हे ताण असे आहेत.

( १ ) नांगरटीची घाई. कारण नांगरट होण्याच्या आधी पाऊस पडल्यास फार नुकसान होईल.

( २ ) नानी–सखाची बायको–गांवाला जायचं म्हणते. ती गांवाला गेल्यास बाहेरचें काम व घरचें काम यांमध्ये सखाचा जीव दामटून जाईल अशी त्याला भीति वाटते. त्यांतच नानीला नवऱ्यापेक्षा बापाची माया अधिक असावी हा टोकणारा संशय.

" बायली रडतियास कशाला ? जीव घेतला काय तुझा ? जा मरजा ! तुझ्या बापाची अपुबाई, नवरा मरंना इकडं ! जा म्हंतो नव्हं–जा ! "

( ३ ) त्यानंतर नानी रागानं निघून जाते.

ताणांचा हा पहिला समुच्चय. यांचा पीळ सखाला असह्य होतो. त्याच्या रागाचा स्फोट येथे होतो व नांगरट करतांना तो बैलांना हाणूं लागतो. पण एकमेकांत अडकलेल्या या ताणांचा पीळ अजून सुटलेला नाही. फक्त त्यांतील राग निघून जातो.

( ४ ) इतक्यांत वादळ येतें व या ताणांना अधिकच पीळ बसतो.

( ५ ) त्यांतच लक्ष्या बैल पळूं लागतो. हा आणखी एक ताण. ' पुढच्या बांधापुढेच ओढा होता. मोठी घळण होती. बैल पडला, पाय मोडला तर !"

ही धास्ती मनाला आणखी एक पीळ घालते.

( ६ ) इतक्यांत वीज पडते व सखाच्या शेतावरचा तोरामतीचा वृक्ष उन्मळून पडतो. या झाडाला महत्त्व आहे. कारण तेवढी एकच सावली त्याच्या शिवारांत होती. आता हें झाड पडल्याने ही सावली तर गेलीच. उलट ' अर्धे शेत त्याने व्यापलें होतें. ' त्यामुळे तें हलवण्याचा व्याप आला. असें दुहेरी नुकसान झालें.

( ७ ) हे सगळे ताण एकमेकांना पीळ घालत येतात. त्यांतल्या रागाचा स्फोट आधीच झालेला असतो. त्यामुळे उरतो फक्त अगतिकपणा. तो शेवटीं असा व्यक्त होतो.

' मान वर करून सखाने तें सारें पाहिलें व चिखलांत बोटें रुतवून तो ढसाढसा रडूं लागला.'

चिखलांत बोटें रुतविण्याच्या क्रियेला येथें विशेष अर्थ आहे. सखूबाच्या आशेचा चिखल झाल्याचें तींदून सूचित होतें.

वरवर पाहतां ही कथा अत्यंत रेखीव, सुबक व सफाईदार वाटते. वर निर्देशिलेले ताण एकमेकांत अगदी ' फिट्ट ' बसले आहेत. पण कथेच्या या रेखीवपणामागे फार मोठा कमकुवतपणा आहे. हा सारा रेखीवपणा एका सांकेतिक यांत्रिकपणांतून निर्माण झाला आहे. कथेच्या अखेरीस सुन्न करणारा परिणाम जाणवायला हवा. पण कथेंतला जिवंतपणा नष्ट झाल्याचें शेवटीं लक्षांत येतें. अधिक सूक्ष्म पाहणींत या कथेंतील ' रचना ' जाणवते. ( २ )

व ( ३ ) मध्ये आलेला नानीचा संदर्भ हा केवळ प्रसंगांत तीव्रपणा भरण्याच्या हेतूने आणलेला आहे. एकुलतें एक झाड विजेने कोसळतें हा ( ६ ) मधील प्रसंग शुद्ध योगायोग आहे. फरक इतकाच की, जुन्या कथेंतला ढोबळ योगायोग येथे अधिक सूक्ष्मत्वाने आला. मग हे प्रसंग लेखकाने कां घातले? याचें उत्तर कथेची मूळ प्रकृति तपासली असतां कळतें. मूळ कथा एवढीच आहे. नांगरट करण्याची सखाची घाई. पण वादळी पावसाने त्याच्या प्रयत्नांवर पाडलेलें पाणी व त्याची केलेली निराशा. हा आशय कदाचित् देसायांना अपुरा वाटला असेल, म्हणून त्यांत अधिक तीव्रता भरण्याकरितां त्यांनी ( २ ), ( ३ ) व ( ६ ) बेमालूमपणें गुंफून दिले. रचनेंतील ही बनावट लक्षांत आली म्हणजे कथेच्या शेवटच्या परिणामाला—तो अशा ( कृत्रिम ) रीतीने एकात्म ( Integrated ) करूनहि—वजन कां प्राप्त होत नाही, हें ध्यानांत येतें. कथा हाताळण्यांतील सांकेतिकतेमुळे कथावस्तूशीं केवढा अप्रामाणिकपणा घडतो, हेंहि लक्षांत येईल.

सातत्याने कथालेखन करीत असलेल्या बि. शं. पारगांवकरांच्या कथेंत ही रचनाविषयक बौद्धिकता प्रकर्षाने आढळते. ' जाग, ' ' फुंकर ' या पारगांवकरांच्या कथा अशा रीतीने तपासल्या म्हणजे एक गोष्ट लक्षांत येते; ती अशी : पारगांवकरांना प्रथम मुख्य कल्पना सुचते आणि नंतर कथेचें शरीर ते अक्षरशः तयार करतात. त्यांची कथावस्तु आपाततः आकार घेतच नाही. ' जाग ' ही कथा थोडक्यांत पाहूं :

पहाटे अचानक जाग आल्यावर जाणवलेल्या अनोख्या भावनेभोवती ही कथा विणलेली आहे. तिची घडण पहा. प्रथम जाग येते. नंतर क्रमशः झोपलेल्या कुटुंबियांचें वर्णन. नंतर आकाशाचें वर्णन. नंतर कांही दिव्यभव्य ' विचार ', नंतर बायकोशीं या विषयावर संवाद. अखेर ही तरल जाणीव देणारी पहाट संपते. कथेच्या विकासाच्या ह्या टप्प्यांचें निबंधरचनेंतील बौद्धिकतेशीं केवढें साम्य आहे ! या (अ)व्यवस्थित रचनेंत मूळ कल्पनेची प्रलयकारी, उत्कट जाणीव कुठे प्रकट होते ? ' कवच ' या कथेंत पारगांवकरांनी एक वेगळा प्रयत्न केलेला आहे. कांही काळ संसार केल्यावर नवराबायकोंच्या संबंधांत जो एक कंटाळवाणेपणा येतो तो रेखाटण्याचा प्रयत्न या कथेंत दिसतो. येथे पारगांवकरांच्या ( कथावस्तूच्या ) बौद्धिक आकलनाचें अनुभूतींत रूपान्तर होत असल्याचें दिसतें.

एखादा विवक्षित क्षण किंवा वैशिष्ट्यपूर्ण प्रसंग रंगविण्याची एक प्रवृत्ति आढळून येते. परंतु अशा तऱ्हेने क्षणकथेकडे किंवा प्रसंगचित्राकडे झुकलेली कथा आपल्या अनेकविध संदर्भांपासून हळूहळू सुटूं लागल्याचें दिसतें. जेव्हा एखाद्या वैशिष्ट्यपूर्ण क्षणीं किंवा प्रसंगीं कांही अर्थपूर्ण घटना अगर आंतरिक संघर्ष घडतो, तेव्हा त्या घटनेशीं अगर आंतरिक संघर्षाशीं संबंधित असे अनेक अदृश्य ताण काम करीत असतात. कथेंत व्यक्त होणाऱ्या त्या क्षणाला किंवा अर्थपूर्ण प्रसंगाला या अदृश्य ताणांमुळेच वजन प्राप्त होतें. याकरिता दृश्य घटना व अदृश्य ताण यांतील परस्परसापेक्षतेकडे दुर्लक्ष होऊन चालणार नाही.

परंतु हा क्षण आणि प्रसंग साकार करण्याच्या प्रवृत्तींत या अदृश्य ताणांची जाणीव हळूहळू सुटूं लागल्याचें दिसतें. ' प्रतीक्षे 'सारख्या कथेंत ज्या प्रेमामुळे या प्रतीक्षेला वजन प्राप्त व्हावें, त्या प्रेमभावनेने प्रतीक्षा भारून जायला हवी. पण लेखकाचें लक्ष केवळ वाट पाहण्याच्या क्रियेवर केन्द्रीभूत झाल्याने कथेला योग्य तें वजन प्राप्त होत नाही हें आपण पाहिलें. विशिष्ट क्षण वा प्रसंग रंगवीत असतांना लक्ष केवळ त्यावरच केन्द्रीभूत झाल्यानें [ व अदृश्य ताणांचा संदर्भ सुटल्यामुळे ] कथेंतील दृश्य भागाला अवाजवी महत्त्व आलें. स्वाभाविकतःच त्यांतील प्रत्येक घटक enlarge होऊं लागला. त्यामुळे कधी आंतरिक बान्ध-

वापासून तर कधी जिवंतपणापासून कथा दूर जाऊं लागली. बाह्यतः ही कथा अधिक बंदिस्त व रेखीव होऊनहि परिणामाच्या तीव्रतेच्या दृष्टीने फिकी होऊं लागली. देसाईंच्या ' वादळ ' या कथेचें आपण विश्लेषण केलें, त्यांत दृश्य घटक नुसते बटबटीत होतात एवढेंच नव्हे तर, या दृश्य आकृतीमागील अदृश्य ताणांचा संदर्भ सुटल्याने त्यांत कांही बनावट घटक कसे येतात हेंहि आपण पाहिलें. उद्धव शेळक्यांच्या ' दाद ' व ' जत्रा ' या कथांना प्रसंगचित्रांचें स्वरूप कां येतें याचें कारण आता लक्षांत येईल. विशेषतः श्री. शेळक्यांची ' दाद ' व श्री. व्यंकटेश माडगूळकरांची ' काय सुदीक गेलं नाही ' या कथा या संदर्भात अभ्यसनीय आहेत. ' दाद ' ही कथा अधिक रेखीव असूनहि कमी परिणामकारक आहे. तिच्यांतील प्रत्येक दृश्य आकृतीला अवाजवी महत्त्व दिलें गेल्याने एकंदर दृश्य घटकांची संख्या वाढते; व दुसरें म्हणजे ती अधिक ढोबळहि होते. उलट माडगूळकरांची उपरिनिर्दिष्ट कथा अधिक अर्थसघन वाटते. अचानक आलेल्या दरोड्याने एक गरीब शेतकरी कुटुंब उद्ध्वस्त होतें, अशी ही कथा आहे. दुःखाचे अनेक पदर एकात्म होऊन या कथेंत अवतरतात. लहान मुलांच्या मनोराज्यांनी केलेली कथेची सुरुवात आणि अखेरीस उद्ध्वस्त झालेलें हें विश्व यांतील विरोध मोठा अर्थपूर्ण आहे. निरभ्र आकाशांतून वीज पडावी तसा दुःखाचा अचानकपणा, या प्रहाराची तीव्रता, शारीरिक व्यथा, आपलें जाऊनहि पोलिसांत फिर्याद देतां येत नाही ही कुचंबणा...आदि अनेक संदर्भांसह ही कथा जिवंत होते. आयुष्यांतील कांही दुःखांचा अचानकपणा आणि असें कां व्हावें या सुन्न करणाऱ्या प्रश्नाला न मिळणारें उत्तर यामुळे एका साध्या घटनेला सर्वस्पर्शित्व लाभतें आणि आपली प्रसंगत्वाची मर्यादा फोडून हें दुःख एका विराट, संदर्भपूर्ण दुःखाचा अपरिहार्य घटक बनतें. याउलट शेळक्यांची कथा स्वतंत्र तुकडा म्हणून येते. एक परिणामकारक प्रसंग एवढ्यापुरती व कदाचित् एवढा एकमेव परिणाम साधण्याच्या शक्तीनेच ती अवतीर्ण होते.

श्री. म. त्र्यं. देवांच्या ' पुरुष ' या कथेचें यशापयशहि मोठें लक्षणीय आहे. या कथेचें लेखन चांगलें झालें आहे. तिची कथावस्तुहि सामर्थ्यपूर्ण आहे. परंतु दृश्य घटनांची सुरेख संगति साधलेल्या ( आणि म्हणून चांगलें लेखन झालेल्या ) या कथेला योग्य तें वजन लाभत नाही. कारण लेखनाची दिशाच हुकली आहे. ती आणि तो यांच्यांतील पुरुषत्वाच्या आविष्काराच्या चढउतारांतील नाट्याचें थरारक दर्शन घडविण्याचा कथेचा उद्देश सफळ होत नाही. त्यामुळे आशयांतील भेदकतेचे कंगोरे गुळगुळीत होऊन एक सुबक घाटाची कथा वाचल्याचें समाधान मिळतें.

कांही मोजक्या घटनांच्या व वेचक तपशिलाच्या साहाय्याने विशिष्ट वातावरण रेखाटण्याचा प्रयत्न सरला कारखानिसांनी ' वॉर्ड नं... ' या कथेंत केला आहे. कारखानिसांच्या या नीटनेटक्या कथेंत वातावरण भारून टाकणाऱ्या विविध भावना आणि त्यांना बसणारे हेलकावे उत्कटत्वाने जाणवत नाहीत. वातावरणाला केंद्रस्थानी ठेवणाऱ्या कथेला अर्थपूर्णता केव्हा लाभते ? अशा प्रकारची कथा ही नेहमीच सोद्देश ( purposeful ) असावी लागते. नुसतें वातावरण रेखाटणें हा कथेचा उद्देशच होऊं शकत नाही. पण कारखानिसांच्या कथेला असा उद्देश लाभलेला नाही. मिरासदारांच्या ' नदीकांठचा प्रकार ' या कथेंतहि वातावरणनिर्मिति केन्द्रस्थानी ठेवलेली आहे. औपरोधिक दृष्टिकोनांतून रेखाटलेलें हें वातावरण अंतीं स्वतःच एका खवचट टीकेंत ( satire ) परावर्तित होतें. गंगाधर गाडगीळांची ' उन्माद ' ही कथा अशा प्रकारच्या कथांच्या संदर्भात उल्लेखनीय आहे. दंगा होतांच जमावाच्या मनांत होणाऱ्या विविध प्रतिक्रियांचें सहेतुक दर्शन गाडगीळांनीं घडविलें आहे. अशा प्रचण्ड उत्पातांच्या वेळीं जीवनांत जी अतर्क्य उलटापालट होते, तिची लय या कथेंत गाडगीळांनीं नेमकी पकडलेली

आहे. वरपांगीं उदात्त दिसणाऱ्या कृत्यांमागचीं क्षुद्र कारणें, क्षुद्र भावनांचें विशिष्ट उदात्त क्षणीं झालेलें सोनें, विविध थरांतील व मनांतील बदलत्या, गतिमान् प्रतिक्रिया यांचें असें गतिपूर्ण चित्रण गाडगीळांनीं केलें आहे की, कथेला एकदम उंच पातळी लाभते.

नाजूक भावनांना समूर्त करण्याचा प्रयत्न करणारी विजया राजाध्यक्ष यांची कथा भावकाव्याकडे झुकते (सतरा डिसेंबर). पण मूळच्या भावस्थितींतील केवलता व तरलता लेखिकेला शब्दरूप करतां आली नाही. त्यामुळे शेवग्याचीं फुलें, उदबत्तीचीं वलयें यासारख्या प्रतिमांचा वापर पुनःपुन्हा केला गेला आहे. स्वाभाविकतःच या प्रतिमा निस्संज्ञ व बटबटीत होत जातात. तारा वनारसे व कमल देसाई यांच्या कथांत एकप्रकारचा, बहुधा भावविवशतेकडे झुकणारा हळवेपणा जाणवतो. हा हळवेपणा अखेर पिंजला जातो व प्रत्ययहीन होऊं लागतो.

कथेची भावकाव्याकडे झुकणारी प्रवृत्ति शंकर पाटलांच्या 'पानगळ' मध्ये स्पष्टत्वाने जाणवते. 'पंखा अंगाईगीत गाऊं लागला,' 'शब्दांना पाळण्याचे झोके मिळूं लागले...' आदि अत्यंत सूचक व बोलक्या प्रतिमांचा वापर या कथेत केला गेला आहे. असह्य तगमग, भरून आलेलें मन आणि वटलेल्या भावना अनुक्रमें उन्ह, पाऊस आणि पानगळ यांच्याद्वारें साकार केल्या आहेत. पण कथेंतील निवेदनाचा कालक्रमाशीं अपरिहार्य असा संबंध असतो. त्यामुळे तिची रचना कालसापेक्ष असते. त्या सापेक्षत्वावरच या प्रतीकात्म ऋतुचक्राचें आक्रमण होतें. निवेदनाचा व कालाचा हा संबंध पाटलांनी कटाक्षाने तोडलेला आहे. त्यामुळे कथा दुर्बोधत्वाकडे झुकण्याची शक्यता निर्माण झाली आहे.

श्री. वि. वा. शिरवाडकर, डॉ. वर्टी आणि रणजित देसाई यांची कथा रम्याद्भुत (Romantic) पठडींतील आहे. पण अशा प्रकारच्या कथेचे जे अंगभूत विशेष असतात, त्यांचा अभाव तिघांच्याहि कथांतून कमीअधिक जाणवतो. शिरवाडकरांची 'अडाणी रंभा' बालकवींच्या काव्याचं रसग्रहण करण्याची कुवत दाखविते, हें उथड उथड हास्यास्पद वाटतें. 'एक वाडा आणि दोन माणसें' या त्यांच्या कथेवर ग. ल. ठोकळांची छाप पडलेली आहे. तिला अखेरीस रहस्यकथेचें स्वरूप येतें. शिरवाडकरांची निवेदनपद्धति ऐसपैस, सैल व तपशीलवार माहिती देणारी आहे. वर्टींची शैली शिरवाडकरांपेक्षा नेटकी आहे. पण त्यांच्या अद्भुतरम्यतेंत वैचारिक पक्वता मुळींच नाही. तींत मनोराज्याचा (wishful thinking) भाग अधिक आहे. कारकुनावर भाळलेली वेश्या, डाकबंगल्यांत उतरलेल्या तरुणावर भाळलेली जंगलकन्या आदि कथांतून हें wishful thinking जाणवतें. खऱ्या नाट्याला व संघर्षाला वर्टी स्पर्श करीत नाहीत. 'पुनर्जन्म'मधील शास्त्रीबुवांच्या पापपुण्याच्या बाळबोध गणिताप्रमाणें त्यांचें कथावस्तूचें आकलनहि बाळबोध व ढोबळ वाटतें. त्यामुळेच 'मा'मधील अबदुल्ल्याच्या जीवनांतील विकास पावणाऱ्या टप्प्यांना (नूरबानूबद्दल प्रथम कृतज्ञता, नंतर थोरल्या बहिणीप्रमाणे वागणूक, तारुण्य येतांच तिच्याशीं आलेला शरीरसंबंध, त्यांतून निर्माण झालेलें पतिपत्नींचें नातें व अखेर मातृप्रेमांत उत्क्रांत झालेलें त्याचें स्वरूप) जी खोली लाभली असती, ती लाभत नाही. उलट यांतील आंतरिक लय वर्टींना न समजल्याने हे टप्पे त्यांनी इतक्या स्थूलपणाने मांडले आहेत की, गोष्टच कृत्रिम वाटूं लागते.

रणजित देसाईंच्या शैलींत एकप्रकारचा रूक्षपणा आहे. त्यामुळे रसिकराज शौनक, ताजमहाल आदि कथांतून जेथे वातावरणाला गहिरेपणा यावयास हवा होता, तेथे त्यांची शैली तोकडी पडते. 'कोणे एके काळीं'मध्ये मिरासदारांनी केलेल्या वातावरणनिर्मितीशीं तुलना करतां देसाईंचे प्रयत्न कितीतरी फिके वाटतात. देसाई असें वातावरण निर्माण करण्याऐवजी मुक्तता तपशील देत जातात. स्वाभाविकतःच हा मार्मिक तपशीलदेखील निरुपयोगी ठरतो.

सर्वश्री द. मा. मिरासदार, पद्माकर डावरे, वि. वि. बोकील, चिं. वि. जोशी, दत्तु बांदेकर, सौ. कमला फडके आदि लेखक-लेखिकांचें विनोदी कथासाहित्य या वर्षी नियतकालिकांतून व संग्रहांद्वारें प्रसिद्ध झालें आहे. वि. वि. बोकील आणि चिं. वि. जोशी यांच्या विनोदाचीं वळणें आता ठरलेलीं आहेत. बोकिलांचा विषय ठराविक आहे. तरुण नवराबायकोंच्या संसाराभोवती हा विनोद घुटमळतो. त्याचें स्वरूप अगदींच सुमार आहे. एकेकाळीं चुरचुरीत असलेली, परंतु आता निवेदनांतील Comment च्या अतिरेकाने असह्य वाटणारी शैली हें बोकिलांच्या विनोदाचें प्रमुख भांडवल आहे; तर इंग्रजीचें शब्दशः भाषान्तर करून संवादांत टाकलेल्या वाक्यरचनेंतील कंटाळवाण्या चमत्कृतीचा चिं. वि. जोशांनी अतिरिक्त वापर केला आहे. 'कृपया दाखवा तुमचें तिकीट', 'आम्ही नाही शकत ॲडव्हान्स आल्यावांचून द्यायला तिकीट दुसऱ्या वर्गाचें' हे अशा भाषांतरजन्य विनोदाचे नमुने. 'सर-पण', 'सर्पण'; 'काय सर', 'कायसर' असल्या बालिश कोट्यांचा जोशांनी सढळ हाताने वापर केला आहे. 'कालाय तस्मै नमः' या कथेंत मात्र जोशांच्या विनोदाचा कसदारपणा जाणवतो.

पद्माकर डावऱ्यांचा विनोद मुळांतच कृत्रिम आहे. डावऱ्यांची (तथाकथित) विनोदी शैली कृत्रिम, unconvincing व विनोद-निर्मितीच्या अट्टाहासांतून निर्माण झालेली आहे. डावऱ्यांच्या कथाबीजांतच विनोदाचा अभाव असतो. त्यामुळे विचित्र, चमत्कारिक नांवांचा वापर (मि. ट्युबरक्युलर मेनिंजायटिस हें एका फॉरेस्ट ऑफिसरचें नांव), अतिशयोक्तीचा अतिरिक्त वापर हे त्यांच्या विनोदाचे घटक बनले आहेत. हा विनोद कधी कधी किती किळसवाणा बनतो, तें पाहा. "त्यानंतरच्या कांही दिवसांत काव्योत्पादनाचे अनेक प्रयोग मी केले. त्यांपैकी कांही सुलभप्रसूति ठरल्या. कांही 'ॲबॉर्शन्स' झालीं. पण त्यामुळे मी डगमगूनहि गेलों नाही, की 'तेलन्धिधी'चा विचारहि मनांत आणला नाही."

मिरासदारांच्या खुसखुशीत विनोदी कथांचाहि आता एक साचा बनलेला आहे. स्वाभाविक निवेदनशैली व मिस्किल दृष्टि असलेल्या मिरासदारांनी चमत्कृतीवर बेतलेल्या अनेक कथा यंदा लिहिल्या. त्यांच्या अंगभूत गुणांचा कोंडमारा या कथांतून झालेला आहे. चमत्कृतीचा एखाद्या लकबेप्रमाणे वापर केल्याने त्यांच्या कथेला एकसुरीपणा आलेला आहे. 'नदीकांठचा प्रकार' आणि 'निरोप' या 'भुताचा जन्म'-मधील दोन कथा मात्र आवर्जून उल्लेख करावा अशा दर्जाच्या आहेत. 'नदीकांठचा प्रकार'मध्ये समुदायाच्या एका विशिष्ट अवस्थेंतील मनाचें चित्रण मोठ्या उपरोधाने केलें आहे. या कथेला तिच्यांतील गंभीर आशयाने फार मोठें वजन लाभतें. ह्या कथेच्या अखेरीसहि धक्का आहे. पण त्या धक्क्यांतील जीवघेण्या उपरोधाने कथेचा परिणाम तीव्र होतो. 'निरोप' कथेंत निरोप कसा बदलला जातो, याचें उपहासात्मक चित्रण आहे. मूळ कथेंतील गांभीर्य आणि ज्या पद्धतीने निरोप बदलला जातो तीमधील हलकाफुलका, अकृत्रिम, मिस्किल विनोद या दोहोंतील विरोधाने कथा अखेरपर्यंत रंगत जाते.

विजय तेंडुलकरांची कथा लक्षांत राहते तिच्या अनुभूतीच्या सखोलपणामुळे. विविध प्रकारच्या आणि विविध पातळ्यांवरील दुःखाचा वेध घेण्याचा प्रयत्न त्यांच्या कथेने केला आहे. सुखाच्या दिशेने वाटचाल करणारी, पण दुःखांत परिवर्तित होणारी माणसाची प्रत्येक हालचाल मृत्यूंत विसावावी या घटनेंतील कारुण्य व अगतिकता (शोध), दारिद्र्याच्या कांचणाऱ्या दुःखालाहि व्यापून उरणारें प्रेम (वर्ष तिसरें), सरळमार्गी, असीम त्यागाची परवड झाल्याने त्याचें शेवटीं उन्मार्गीपणांत रूपान्तर व्हावें या घटनेमागील दारुण दैवदुर्विलास (केशव) हीं कांही ठळक उदाहरणें. निवेदन आणि बांधणी याबाबत तेंडुलकरांनी अधिक

जागरूकता दाखविली तर यापेक्षाहि संस्मरणीय कथांची अपेक्षा त्यांच्याकडून करतां येईल. तेंडुलकरांत आढळणारी ही दुःखाचा वेध घेण्याची प्रवृत्ति ( Sense of tragedy ) जी. ए. कुलकर्ण्यांच्या ' कांकणें ' या कथेंत प्रकर्षानें आढळते. ऐसपैस पसरलेली ही कथा अधिक रेखीवपणानें लिहिली गेली असती तर तिला आणखी वरची पातळी लाभली असती.

आजच्या कथेंतील सूचकता श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णींच्या कथेंत संदिग्धतेचें स्वरूप धारण करते. या संदिग्धतेला कारणीभूत होणारी अलिप्तता नाडकर्णींच्या कथांतील घटकांच्या मांडणीला असें वळण देते की, आशयाचे पदर अधांतरीं लोंबूं लागतात. त्यामुळे एकप्रकारचा रुक्षपणा देखील या कथेंत येतो व तिचें प्रत्ययकारित्व कमी होतें. वैयक्तिक विकृति असलेल्या जगदाळ्यांचें चित्रण करणारी ' भरती, ' किंवा ' नृत्य, ' ' तरंग ' या कथांचीं केंद्रस्थानें अस्पष्ट राहतात. निवेदनशैली, रचना आदि बाबतींत स्व'तंत्र ' असलेली व आशयाचें वैविध्य लाभलेल्या ह्या कथेंतील आशय जसजसा समृद्ध होत जाईल, तसतसें तिला वैशिष्ट्यपूर्ण स्थान लाभत जाईल.

शांतारामांची निवेदनपद्धति वित्ररण करणारी, निबंधपद्धतीची आहे. या शैलीला सुटसुटीत वळण मिळूं लागल्याचें त्यांच्या ' छळ ' या संग्रहांत दिसतें. कांहीं सर्वसामान्य अनुभवाचें चित्रण शांतारामांनी या कथांतून केलें आहे. ' प्रतिष्ठा, ' ' कलावन्त ' अशा कांहीं कथांतून गाडगीळ-भाव्यांचे संस्कार जाणवतात. ' अपेक्षी ' या कथेंतील आठवणी तिच्यांतील जिव्हाळ्यानें हृद्य झाल्या आहेत.

पु. भा. भाव्यांची गडद छाप पडलेल्या कथा ' चेहरा ' या वसुंधरा पटवर्धनांच्या संग्रहांत आढळतात. पुनरुक्ति, पाल्हाळ, संवादाची शैली, एखाद्या मधल्या बिंदूपासून कथेला सुरुवात करून पूर्वभागावर सावकाशपणें प्रकाश टाकत जाण्याची लकब या साऱ्या गोष्टी बाईंच्या कथेंत आढळतात. ' सती ' सारख्या कथेंत तर आशयावरदेखील भाव्यांच्या मनःप्रक्रियेची दाट छाया पडल्यासारखी वाटते. या कथेंतील अखेरीस यमुनाबाईंच्या मनःस्थितीचें बाई अक्षरशः वर्णन करतात. पण ती भावना त्यांना शब्दांत पकडतां आलेली नाही. ' कमल ' हा बाईंचा एक मोठा प्रयत्न. कमलला पडलेल्या प्रश्नांचा ( कांहीं भागांत ) रंगतदार झालेल्या संवादांतून केलेला आविष्कार वसुंधराबाईंच्या प्रयत्नांची श्रेष्ठता पटवितो. येथे प्रश्नांना आणि तात्त्विक विचारांना कमल व मालती यांचीं शरीरें लाभलीं आहेत. पण शरच्चंद्रांच्या कमलला जसें हाडामांसाचें शरीर लाभतें, तसें लाभायला कथेचें माध्यम थिटें पडतें. हा दोष अर्थातच वसुंधराबाईंचा नाही.

पु. भा. भाव्यांच्या ' कुभांड ' या संग्रहांत कांहीं जुन्या व कांहीं अलीकडच्या कथा समाविष्ट केल्या आहेत. भाव्यांचे सर्वपरिचित दोष या संग्रहांत आधिक्यानें आढळतात.

' रस्ता ' ही ' वेगळें विश्व 'मधील गाडगीळांची कथा मोठी अर्थपूर्ण ( Significant ) आहे. भयाण,अंधाऱ्या जीवनांत हिंडणाऱ्या घुशीसारख्या वासना, वेश्यांच्या अर्थशून्य हालचाली आणि उन्मत्तपणांत दडलेला भोग यांनी विळखा घातलेल्या व पिवळ्या, अस्वच्छ प्रकाशानें माखलेल्या जीवनांतून सुटण्याची व जीवनाचा अर्थ शोधून काढण्याची त्यांची धडपड आणि या धडपडीला सहायभूत होणारी त्यांची अंतर्भेदी दृष्टि दिसून येते. भिरभिरं, बिनचेहेऱ्याची संध्याकाळ या कथांच्या मालिकेंतील ही आणखी एक कथा. गाडगीळांच्या इतर कथांतून त्यांचीं नेहमींचीं वैशिष्ट्यें आढळतात.

आणखी एक लक्ष वेधून घेणारा संग्रह मधु मंगेश कर्णिकांचा. त्यांच्या कथांतील सुरुवातीचा अनुकरणाचा भाग कालांतरानें गळून गेला व त्यांना स्वतःचें कथाविश्व सांपडलें,

४

तर कर्णिक चांगली कथा देऊं शकतील असा विश्वास ‘ कोंकणी ग वस्ती SS ’ मध्ये मिळतो. त्यांच्या अनुभवांतील ताजेपणा आणि शैलीचें प्रत्ययकारित्व हा या विश्वासाचा आधार. शंकरराव खरातांच्या कथांत व व्यक्तिचित्रांत जें उघडेंबोडकें वास्तव आढळतें, त्याचें कलात्म वास्तवांत रूपांतर झाल्यास खरात मराठीला सामर्थ्यशाली ( Vigorous ) कथा देऊं शकतील.

याखेरीज श्री. ज. जोशी, वि. बा. मोकाशी, गो. नी. दांडेकर, विद्याधर पुंडलिक, स. आ. जोगळेकर, मंगेश पदकी, सरिता पदकी, बाळ गाडगीळ, मधुसूदन अकलूजकर, ए. वि. जोशी, बाबा पाटील, आ. ना. पेडणेकर, गजानन क्षीरसागर, मनोहर तल्हार, सुमति क्षेत्रमाडे, माधव कानिटकर, आनंद रेगे, वसुधा पाटील, मधुकर परांजपे, गो. गो. दाते, क. घि. सोनटक्के, पुरुषोत्तम धाक्रस, अच्युत बर्वे, उर्मिला शिरूर, आनंदीबाई शिर्के, श्रीकृष्ण खाडिलकर आदि लेखकांनी व याखेरीज सूचींत नमूद असलेल्या लेखकांनी यथाशक्ति कथालेखन केलें आहे.

येथवर १९५८ सालांतील कथेचें त्रोटक विवेचन केलें. रचनेंतील साक्षेप हा सध्याच्या कथेचा एक मोठा विशेष होऊन बसला आहे पण फडकेप्रणीत चढउताराचे खटके आणि ही तांत्रिक प्रगल्भता यांत मोठा फरक आहे. आजच्या तांत्रिक प्रगल्भतेमध्यें अनुभवाला स्वाभाविक आकार देण्याची धडपड दिसून येते, ही फार महत्त्वाची गोष्ट आहे. कलाकृतींतील उपऱ्या घटकांचें आगमन, कलात्मतेची बौद्धिक जाणीव, या जाणिवेमुळें कथेंतील दृश्य घटकांच्या आकारमानांत वाढ ( Enlarge ) होणें, क्वचित् अनुभव घेण्याच्या प्रक्रियेंतच अनुकरण व अनुकरणांतून वा अन्य कारणांनी कथावस्तूशीं झालेला अप्रामाणिकपणा आदि दोषांनी आजची कथा डागळली आहे. हें गृहीत धरूनहि असें म्हणतां येईल की, अनुभूतीशीं इमान राखण्याची प्रवृत्ति जोंपर्यंत शाबूत आहे, तोंपर्यंत या दोषांना भिण्याचें कारण नाहीं. उलट आजचें तंत्रविषयक अर्जित कथालेखनाला नवनव्या दिशाच दाखवील. मात्र हें अर्जित साध्य नसून साधन आहे हें विसरून चालणार नाहीं. नाडकर्णींच्या कथेंतील आलिप्तता किंवा पाटलांच्या कथेंतील सूचकता या दोन्ही गोष्टी कलेमधील दुर्मीळ असे गुण आहेत. या गुणांचा उपयोग अखेरपर्यंत श्रेष्ठ अनुभवांच्या शोधांतून गवसलेल्या सत्यांचा आविष्कार करण्याकरिता व्हावा.

ग्रामीण कथेबाबत आता अंतर्मुख होण्याची वेळ आली आहे. प्रादेशिक बोली; अजेंट, जंक्शन, फास्ट, बिरेक, स्टुरी आदि शब्दांचा बोलींतील सवंग वापर; एकाच कथेंत दहा वेळां पान खाऊन ‘ पचकन् ’ थुंकण्याचीं वर्णनें, या गोष्टींच्या साहाय्याने ग्रामीण कथा तयार होते काय? मुळांतच ग्रामीण व नागरी हे भेदच कृत्रिम आहेत. पण ज्या विशिष्ट भूप्रदेशांतील व्यक्तींभोवती कथा गुंफल्या जातात, त्यांचें या व्यक्तींच्या घडणीशीं निकटचें नातें असलें पाहिजे. तेथील माणसांची घडण त्या मातींतून झाली पाहिजे. पेंडसे-माडगूळकरांच्या लिखाणांतील त्या त्या भूभागाचें अस्तित्व किती संदर्भपूर्ण व अनिवार्य आहे, हें आपण जाणतोंच. या दृष्टिकोनांतून विचार करतां आजच्या ग्रामीण कथेंत ‘ ग्राम ’ शिल्लक उरलें आहे का, असा प्रश्न मनापुढे उभा राहतो.

आजच्या मराठी कथेपुढील समस्या अशा प्रकारच्या आहेत, आणि त्या सोडविणाऱ्या श्रेष्ठ कथेची वाट पहाणें एवढेंच माझ्यासारख्या नम्र समीक्षकाच्या हातांत आहे. ● ● ●

**टीप :** ‘ काय सुदीक गेलं नाहीं, ’ ‘ उन्माद ’ व ‘ कोणे एके काळीं ’ या अनुक्रमें सर्वश्री माडगूळकर, गाडगीळ व मिरासदार यांच्या कथा प्रस्तुत आढाव्याच्या कालमर्यादेंत बसत नाहींत; परंतु कांही मुद्दयांचें स्पष्टीकरण होण्याकरितां त्यांचा उपयोग करून घेतला आहे.

प्रा. गो. म. कुलकर्णी, एम्. ए.

# कादंबरी

१९५८ मध्ये प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्यांचें समालोचन करणाऱ्याला, या वाङ्मय-प्रकाराची पूर्वीची भरभराट व आजची अवकळा यांतील विरोध जाणवल्याशिवाय राहत नाही. एकेकाळचा, सर्वसामान्य वाचकांच्या रंजनाचा व उद्बोधनाचा हा आवडता व संपन्न प्रकार आज क्षीणशक्ति झाल्याची जाणीव सर्वांनाच आहे. इतर वाङ्मयक्षेत्रांतील प्रयोगशीलता, गतिमानता व चैतन्य या क्षेत्रांत आढळत नाही. जुनीं पानें गळून पडल्याचें दिसतें, पण नवीन मोहर बेत असल्याचीं अद्यापि चिन्हें दिसत नाहीत; दिसतो तो फक्त भुंडेपणा. एका बाजूने कादंबरी हा आधुनिक वाङ्मयप्रकार असल्याचें व त्याने आज महाकाव्याच्या आणि चरित्र-वाङ्मयाच्या कांही कक्षा व्यापल्याचें सांगण्यांत येतें, तर दुसऱ्या बाजूने आपल्याकडे जें दृश्य दिसतें तें हा प्रकार संकोच पावल्याचें, कालपक्व झाल्याचें. बोलपटांनी रंजनाचें व्यापलेलें क्षेत्र, घरंगळती वाङ्मयाभिरुचि, मुद्रणाची महर्गता इत्यादीमुळे कादंबरीच्या विकासांत अडथळे निर्माण झाले आहेत हें खरें, पण ते एका दृष्टीने गौण होत.

कादंबरीच्या आपल्याकडील आजच्या दुरवस्थेचें प्रमुख कारण असें की हा प्रकार यापूर्वी सामाजिक, राजकीय वगैरे बाबींची चर्चा, फोड, मीमांसा इत्यादि करण्याचें एक साधन म्हणून वापरला गेला. या भूमिकेचा कलादृष्ट्या कादंबरीवर जरी कांहीसा प्रतिकूल परिणाम झालेला असला तरी या सामाजिक प्रेरणांनी लेखकांना एका उत्साहशक्तीचा सातत्यानं पुरवठा केला. आजच्या कलाविषयक दृष्टिकोनांत या प्रकारच्या चर्चेला स्थान राहिलेलें नाही; शिवाय ज्या तात्त्विक मूल्यांच्या आधारें ही चर्चा होत असे तो वाचक व लेखक यांच्यामधील समान अनुबंधाचा धागाहि आज तुटून पडला आहे; आणि या वाङ्मयप्रकारांत यापूर्वी आढळणारा ऐसपैसपणा व संथपणा आजच्या वेगवेगळ्या जीवनांत येणेंहि एक प्रकारें आता अशक्य आहे. या बदलत्या परिस्थितींतून पाश्चात्त्य लेखकांनी या नव्यानेच अवतीर्ण झालेल्या वेगाला कथा-विषय बनविलें आणि बाह्य विश्वापेक्षा अंतर्मनाचा वेध घेण्यास प्रारंभ केला. यामुळे कादंबरीला आवश्यक ती नवी दिशा मिळाली. आपल्याकडे ही नवी दिशा कथा-काव्यांतून जशी आढळते तशी कादंबरींत अद्याप आढळत नाही. कै. मर्ढेकरांनी काव्याप्रमाणेच कादंबरीलाहि वेगळें वळण देण्याचा प्रयत्न केला, पण काव्याप्रमाणे तो कादंबरीच्या क्षेत्रांत ( कारणें कांहीहि असोत ) यशस्वी झाला नाही. एकंदरीने कालमानानुसार निवेदनाच्या कांही जीर्ण तऱ्हा बदलण्यापलीकडे या क्षेत्रांत विशेष कांही झालें नाही. जें झालें तें अगदी जुजबी व उपरें. विस्तीर्ण अशा जीवनप्रवाहाचा वेध घेण्यास सहायक होणारें. हें कलामाध्यम बदलत्या परि-स्थितींत तेवढ्या निष्ठेने, हिमतीने व आंतरिक अपरिहार्यतेने हाताळणारा नवा लेखक अद्यापि उदयास यावयाचा आहे. ही किमया केव्हा घडेल तेव्हा खरी. गेल्या कांही वर्षांप्रमाणे ती १९५८ सालींहि घडलेली नाही. जें झालें तें मागील अंकावरून पुढे या प्रकाराचें किंबहुना त्याहूनहि कमीच.

दांडेकर-पेंडसे ही आजच्या कादंबरीक्षेत्रांतील आघाडीची जोडी १९५८ सालीं अभा-वानेच तळपते. मनोविश्लेषणाच्या भूमिकेवरून हालचाल करणारे वसंत कानेटकर यांनीहि या क्षेत्राकडे पाठ फिरविलेली दिसते. ज्येष्ठ मंडळींपैकीं खांडेकर-माडखोलकरांनी आपली हजेरी लावलेली नाही किंवा संस्मरणीय अशा कोणा नवीनाचेंहि दर्शन घडत नाही. ऐति-हासिक वगैरे प्रकार तर जाऊंद्याच, पण रूढ प्रादेशिकताहि थोडी मागे पडलेली दिसते. विभावरी शिरूरकर, मालतीबाई दांडेकर, शांता शेळके, नाशिककर इत्यादि स्त्रियाहि या दालनाकडे फिरकल्या नाहीत, याला अपवाद काय तो सरोजनी बाबर यांच्या ‘ आणि इथे गोष्ट संपली ’

या कादंबरीचा. पण उल्लेखापलीकडे हींत कांहीच आढळत नाही. १९५८ सालच्या कादंबरीच्या समालोचनांत प्रामुख्याने विचार करावयाचा तो प्रा. ना. सी. फडके, र. वा. दिघे, पु. भा. भावे, चंद्रकांत काकोडकर, ज्ञानेश्वर नाडकर्णी, ग. दि. माडगूळकर, क. दि. सोनटक्के, य. गो. जोशी व चिं. वि. जोशी या मंडळीच्या कृतींचा. हा विचार करण्यापूर्वी एका गोष्टीची थोडी दखल घेणें आवश्यक आहे. १९५८ मध्ये प्रसिद्ध झालेल्या एकूण कादंबऱ्यांपैकी सुमारें एकतृतीयांशाहून थोड्या अधिक इतक्या कादंबऱ्या अनुवादात्मक आहेत. मध्यंतरीं बंगाली, हिंदी वगैरे भारतीय भाषांतील कादंबऱ्यांचे अनुवाद अधिक होत होते. १९५८ मधील जवळजवळ साऱ्याच अनुवादात्मक कादंबऱ्या पाश्चिमात्य आहेत. यांत ' क्राइम ॲण्ड पनिशमेंट ' सारख्या श्रेष्ठ कलाकृतीपासून रेनॉल्डस्च्या ' नेक्रोमान्सर ' सारख्या अद्भुतरम्य कादंबरीपर्यंत अनेक प्रकार आढळतात. 'डेव्हिड कॉपरफील्ड् ', ' अंकल टॉम्स केबीन ', ' लव्ह इज इटर्नल् ', ' ॲनिमल फॉर्म ', ' ऑफ् माइस ॲण्ड मेन ', ' ॲण्ड स्टिल दे ड्रीम ', ' थ्री मेन ॲण्ड ए बोट ' वगैरे कलाकृतींचे अनुवाद, भाषांतर वा रूपांतर केले गेलेले आहेत. या अनुवादांचें एकंदर स्वरूप पाहतां परकीय ललितकृतींच्या परिचयाबरोबरच आजची आपली दुष्काळी गरज भागविण्याचा हेतूहि त्यांत दिसतो.

' पानिपतची मोहीम ' ही एकच या सालांतील अशी पुनर्मुद्रित कृति; तीहि अंशरूपानेच मुद्रित झाली आहे. तिचे पुनर्मुद्रण दोन भिन्न लेखक-प्रकाशकांनी केलें असलें तरी दोघांचाहि हेतु एकाच विभागावर–तींतील लालन बैरागिणीच्या कथानकावर–भर देण्याचा आहे. शिरीष अत्रेनी मूळ कथानकावर आधुनिक भाषेचा साज चढविला आहे, तर श्री. पां. रा. ढमढेरे यांनीं मुळांतील भाषाच कायम ठेविली आहे. मूळ कलाकृतीवर भाषादृष्ट्या असें संस्करण करणें कितपत योग्य, हा प्रश्न बाजूला ठेवला तरी ऐतिहासिक वातावरणाच्या आभासासाठी प्रसिद्ध असलेल्या या कादंबरींत भाषादृष्ट्या शिरीष अत्रे यांनी केलेले बदल उपकारक ठरलेले नाहीत. या बाबतींत श्री. ढमढेरे यांचें धोरण योग्य वाटतें.

संस्करणाचाच एक वेगळा प्रयत्न य गो. जोशी यांच्या ' सुपारी ' या कादंबरींत आढळतो. याच नांवाच्या आपल्या कथेला केवळ वर्णनाचा तपशील वाढवून त्यांनी कादंबरीचा घाट देण्याचा प्रयत्न केला आहे. लघुकथेचें कादंबरींत रूपांतर करतांना मूळ कथावस्तूंतहि कांही महत्त्वाचे बदल करावयास हवेत ही जाणीव य. गों. च्या या कादंबरींत दिसत नाही. कादंबरी म्हणजे विस्तार आणि विस्तार म्हणजे तपशीलवार वर्णन असें हें समीकरण आहे. त्यामुळे वर्णनाचें हें खूपसें पाणी पातळपणाखेरीज कांहीच निर्माण करीत नाही. चिं. वि. जोशी यांची ' प्रवरा ' म्हणजेहि एक संस्करणच. त्यांच्या वडिलांनी १९१३–१६ मध्ये लिहिलेल्या हस्तलिखितांत कांही बदल करून तें त्यांनी प्रसिद्ध केलें आहे. कादंबरीचें तंत्र अर्थातच जुनें आहे. नगर जिल्ह्यांतील एका सामान्य कुटुंबावर इंग्रजी सुधारणांचा परिणाम होऊन त्या कुटुंबांत झालेल्या स्थित्यंतराचें चित्र लेखकाला रंगवावयाचें आहे. जुन्या समाजस्थितीचें जीवन थोड्याफार यशस्वीपणें यांत चित्रित केलें आहे. या कादंबरींतील यशस्वी असा अंश एवढाच. दोन भिन्न संस्कृतींचा प्रबल संघर्ष हा महत्त्वाचा भाग न मानतां सुधारणावादाचा उपहास करण्यावर लेखकाने भर दिल्याने कादंबरीचा तोल बिघडला आहे. सुधारणावादाविरुद्ध लिहिल्या गेलेल्या जुन्या काळांतील नाटकांची जी भूमिका तीच या कादंबरीची.

' तेथें देवाची वसती ' ही चिं. वि. जोशींची स्वतंत्र कृति. ' कोंकणच्या निसर्गरम्य पार्श्वभूमीवरील विविध रसांनी ओथंबलेली स्वतंत्र सामाजिक कादंबरी ' अशी हिची जाहिरात

करण्यांत आली असली तरी 'निसर्गरम्य'तेचा वा 'विविध रसां'चा येथे प्रत्यय येत नाही. अतिसात्त्विक वृत्तीची व्यक्ति (शांतिलाल) व अतिदुष्ट वृत्तीची व्यक्ति (बाळाराम) यांतील विरोध अतिस्थूलपणें या कादंबरींत दाखविला आहे. अतिसात्त्विक वृत्तीचा विजय दाखविण्यासाठी स्थल, काल व योगायोग यांचा मनःपूत उपयोग लेखकानें केला आहे. 'दया, क्षमा, शांति, तेथे देवाची वसती' हें बोधवचन वाचकांच्या गळीं अक्षरशः उतरविण्यासाठी पात्रांचीं नांवेंहि दया, क्षमा, शांति अशीं ठेवण्यांत आलीं असून शेवटीं त्यासाठीच तीं सर्व पात्रें एकत्रहि आलीं आहेत!

प्रा. जोशी यांच्याप्रमाणेच प्रा. ना. सी. फडके यांच्याहि दोन कादंबऱ्या यंदाच्या दिवाळी अंकांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. फडके यांच्याइतक्या नियमितपणें, सातत्यानें कादंबरीलेखन करणारा दुसरा लेखक महाराष्ट्रांत अद्यापि झाला नाही. 'जहर' व 'ऋतु-संहार' या त्यांच्या अनुक्रमें ४५ व्या व ४६ व्या कादंबऱ्या; त्यांच्या कादंबरीलेखनाला प्रारंभ होऊनहि जवळजवळ तितकींच वर्षें होत आलीं. या सुमारें अर्धशतकांत मराठी समाजजीवनांत, दृष्टिकोनांत व लेखनशैलींत अनेक स्थित्यंतरें झालीं, पण मन्वादिकांनी घालून दिलेल्या मार्गापासून रघुकुलांतील राजपुरुष ज्याप्रमाणें रेषामात्र ढळले नाहीत त्याप्रमाणें प्रा. फडके यांनीहि आपलें कादंबरीलेखन स्वतःच आखून घेतलेल्या तंत्रापासून अणुमात्र ढळूं दिलें नाही. कलासृष्टींतील हें स्थाणुत्व विस्मयावह आहे. त्यांच्या मूळ कसबांतील सारे पेंच आपल्या मूळ झिलईसह अद्यापि शाबूत आहेत. भाषा व वर्णनें यांबाबतचें किंचित् बदललेलें धोरण वजा करतां, कालप्रवाहाचा त्यांच्या या कारागिरींतील प्रभुत्वावर कांहीहि परिणाम झालेला नाही. त्यांच्या नायकनायिकांप्रमाणेच त्यांचें हें लेखनकौशल्यादि नेहमीच तारुण्याच्या उत्सा-हाच्या आनंदांत रममाण झालेलें असतें. त्यामुळे त्यांच्या कोणत्याहि कादंबरीवाचनापासून मिळणारा हुकमी 'पुनःप्रत्यय' या नव्या कादंबऱ्यांतहि मिळतो. दोन्हीहि कादंबऱ्यांचा साचा साधारणपणें सारखाच आहे. सुखसंपन्न, उमदे, राजबिंडे नायक, त्यांच्यावर भिन्न पातळीवरील रूपगुणयुक्त अशा नायिकांचें जडलेलें प्रेम, परिस्थितिभिन्नतेमुळे चिरमीलनांत निर्माण झालेले अडथळे, या अडथळ्यांचें योगायोगानें होणारें निवारण आणि मग आनंदीआनंद; असें हें तंत्र आहे. विरह व मीलन यांचीं चविष्ट वर्णनें, नायिकांचे लडिवाळ हावभाव, खटके-बाज संवाद, नर्म विनोद इत्यादि नेहमींच्या बाबीहि अर्थात् आहेतच. या कादंबऱ्यांतील नायक आपल्या सुखासीन आसनावरून फारसा कधी ढळत नाही; दुःखाचा जो कांही भोगवटा असेल तो सारा नायिकांच्या वांट्याला येतो; आणि या दुःखाची बोंच कमी करण्यासाठीच की काय त्याचें विवेचन वाचकांसमोर येतें तें पूर्वस्मृतींच्या रूपानें.

'जहर'मधील सत्याच निवेदनपद्धतीवर या सिनेतंत्राची छाया पडली आहे; एवढेंच नव्हे तर एखाद्या सिनेमा 'स्टोरीं'तच आढळावा असा सारा मालमसाला या कादंबरींत भरपूर आहे. (विवाहबाह्य शृंगार, त्याला लाभलेली ग्रामीण निसर्गाची पार्श्वभूमि, मोहनिद्रा, नजरबंदी, परिस्थितीच्या फेरगतीनें नायिकेचें वेश्यागृहांत होणारें आगमन, पिस्तुलाच्या अप-घाती बारानें नायिकेकडून घडलेला मनुष्यवध, तिच्यावरील खुनाचा आरोप, खटला, इ. इ.). या सनसनाटी कथेला कांहीसें तोलून धरलें आहे, तें प्रा. फडके यांच्या बाह्य व सुबक वर्णनांनी व टापटिपीनें.

'ऋतुसंहारां'तहि ही वर्णनाची टापटीप आढळते. सहा ऋतु, त्यांचा मानवी जीव-नांतील विविध अवस्थांशीं संबंध जोडण्याचा केलेला प्रयत्न, कादंबरीचीं सहाच प्रकरणें, बरोबर तीन प्रकरणांनंतर बसलेली कथानकाची 'निरगांठ' इत्यादि सफाईचीं बाह्यांगें पुरेशीं

आहेत; परंतु नेहमीपेक्षाहि अधिक प्रमाणांत योगायोगांचा लेखकाने वापर केल्याने ही सारी सफाई फुकट गेली आहे. कथानक सर्वस्वीं योगायोगांच्या (म्हणूनच लेखकाच्या) लहरीवर फिरत राहिलें आहे, आणि यामुळे सुखदुःखांचे आघात व त्यांचा कल्लोळ प्रकट करण्याची सारी ऐट व्यर्थ झाली आहे. त्याला कुठेच प्रत्ययकारित्व लाभत नाही. सोपीं, स्थूल अपघाती घटनांनी भरलेलीं कथानकें, तकलादू व्यक्तिदर्शन, निवेदनांतील आंतरिक लयीचा अभाव हे आजच्या आपल्या कादंबरी-वाङ्मयाचे प्रमुख दोष याहि कादंबऱ्यांत आढळतात. वरवर विचार केल्यास भाषाशैलीसाठी प्रसिद्ध असलेल्या फडके यांच्यासारख्या सिद्धहस्त लेखकांत भाषादृष्टया कांही दोष आढळणारहि नाहीत. गतिशीलता नादनिष्ठता, प्रसाद इत्यादि गुण फडके यांच्या भाषेंत निःसंशय आहेत. भाषेचा तोल यत्किंचितहि बिघडूं न देतां सहजपणें ते परिच्छेदामागून परिच्छेद लिहूं शकतात. परंतु या भाषेचा घाट सर्व परिस्थितींत, सर्वच पात्रांच्या बाबतींत एकच म्हणजे प्रा. फडके यांचाच राहतो. तिला पात्रनिष्ठता कधी लाभतच नाही. पहिल्या वर्गांत एम्. ए. झालेला महाराष्ट्रीय हेमू रानडे व पोटासाठीं वणवण करीत असलेली निर्वासित अशी सिंधी चंदा; किंवा लष्करी नोकरींत असलेल्या जिल्हा न्यायाधिशाचा मुलगा सुभाष व त्यांच्याच घरीं मोलकरणीची मुलगी म्हणून वाढलेली, शिक्षणाचा गंध नसलेली काशी प्रा. फडके यांच्या कादंबरीविश्वांत एकच भाषा वापरतांना आढळतात. याचा अर्थ भाषाशैलीच्या बाबतींत आमची मजल अलंकरणापलीकडे ( rhetorics ) गेली नाही असाच होत नाही काय ?

या अलंकरणाचा अतिरेक श्री. प्रफुल्लदत्त यांच्या ' तपोबनांतील दुर्वा ' ( की दूर्वा ?) या पुस्तकांत आढळतो. हें पुस्तक दैनंदिनीचा निवेदनप्रकार अंगीकारून कुसंस्काराने बिघडलेल्या मुलाबद्दलचें दुःख व्यक्त करणाऱ्या पित्याच्या भूमिकेवरून लिहिलें आहे. ही दैनंदिनी लिहिणारा गृहस्थ एक सामान्य शिक्षित आहे. रोजचे हिशेब मांडण्यापलीकडे किंवा अधूनमधून एखादें पत्र लिहिण्यापलीकडे कधी कांही लिहिलें नसल्याची त्याची स्वतःचीच कबुली आहे. असा हा गृहस्थ आपल्या दैनंदिनींत मात्र सर्रास गडकरी थाटाची भाषा वापरतो. त्याची अशिक्षित पत्नी किंवा अर्धशिक्षित उनाड मुलगा यांच्या तोंडी घातलेली भाषाहि अशीच अलंकारप्रचुर आहे. दैनंदिनी हा अत्यंत व्यक्तिगत, त्रुटित विशेषतः अनौपचारिक असा लेखनप्रकार असल्याचा लेखकाला पूर्णतया विसर पडलेला दिसतो. कुसंस्काराने बिघडणारीं मुलें ही एक ज्वलंत समस्या असली व या समस्येबद्दल व्यक्तिशः प्रफुल्लदत्तांना कितीहि तळमळ वाटत असली तरी तिची मांडणी या अशा उबवलेल्या पद्धतीने केलेली असल्यामुळे ती तळमळ फुकट गेली आहे.

केवळ कृत्रिम निवेदनामुळेच नव्हे तर वर्णनांतील साक्षेपाच्या अभावामुळेहि कादंबरी परिणामशून्य होते. ग. दि. माडगूळकर यांची ' आकाशाचीं फळं ' ही या प्रकारची कादंबरी मानतां येईल. विशिष्ट जीवनपद्धतीचा सूक्ष्म परिचय, आशयानुकूल अशी सहजसुंदर भाषा, वातावरण-निर्मितीचें सामर्थ्य इत्यादि सामग्री असूनहि माडगूळकर यांची ही कादंबरी वरील कारणांमुळे अयशस्वी होते. कथानकाचीं अपघाती वळणें या अपयशांत भर घालतात. प्रत्ययकारी व्यक्तिदर्शन असतें तर एकवेळ हेहि दोष खपले असते. ( मग कदाचित् ते निर्माणहि झाले नसते ) पण कादंबरीचा हा कणाच बहुतेक कादंबऱ्यांतून भंगलेल्या स्थितींत आढळतो. १९५८ मधील बहुसंख्य कादंबऱ्यांचा शेवट दुःखात्म आहे; पण हें दुःख शोकान्तिकेच्या पातळीवर यामुळे क्वचितच चढतें. चंद्रकांत काकोडकरांच्या ' अभिमान ' कादंबरीला अपेक्षित यश मिळू शकलें नाही, त्याचें कारण हेंच. यांतील बाप्पा सरदेसाई ही बदललेल्या परिस्थितींतहि

स्वतःच्या खानदानी कुलाचा विलक्षण अभिमान बाळगणारी व्यक्ति; त्यांच्या आततायी आंधळ्या अभिमानाच्या पायीं सर्व कुटुंबाची वाताहत होते, आणि कुलाभिमानाच्या दृष्टीने ज्या गोष्टी बाप्पा टाळूं इच्छितात त्याच नेमक्या निसर्गक्रमांत त्यांच्या मुलाबाळांच्या हातून झाल्याने शेवटीं बाप्पा आत्महत्या करतात हें या कादंबरीचें सर्वसाधारण कथासूत्र. वस्तुतः कादंबरीची परिणामकारकता बाप्पांच्या अहंतेच्या कडा पद्दाडीपणाने उभ्या राहण्यावर अवलंबून आहे, पण लेखकाने बाप्पांना त्यांच्या मुलांकडून इतक्या वेळां व इतक्या प्रकारें भुईसपाट लोळविलें आहे कीं, बिचारे कधीं धडपणें जमिनीवरहि उभे राहूं शकत नाहीत. शेवटीं त्यांचें बाप्पापण आत्महत्येंतून जें काय प्रकट होतें तेवढेंच. बाप्पांची मुलगी सुमन व तिचा प्रियकर वामन यांच्या प्रणयवर्णनालाहि या कादंबरीत वाजवीहून अधिक जागा दिली गेली आहे. योगायोगांचाहि मनसोक्त वापर आहेच. वेश्यांच्या एकनिष्ठत्वाला काकोडकरांच्या दोन्ही कादंबऱ्यांत खास महत्त्व प्राप्त झालेलें आहे. नायकाला ठिकठिकाणीं भेटलेल्या अशा प्रकारच्या स्त्रिया व त्यांचीं वर्णनें त्यांच्या ' तेथें कर माझे जुळती ' या ( या वर्षीच्या ) दुसऱ्या कादंबरींत बरींच आलीं आहेत. ' गोमंतकांतील चालू राजकारणावरील कथा ' म्हणून जरी ही वाचकांच्या समोर ठेवण्यांत आली असली तरी राजकारणविषयक कादंबरीची आपल्याकडील नेहमीची तऱ्हा–राजकारण थोडें, प्रेमकारण अधिक–याहि कादंबरींत आढळते.

राजकारणदृष्ट्याच विचार केल्यास प्रस्तुत कादंबरीचा विषय अगदीं ताजा, जिव्हाळ्याचा, प्रक्षोभकहि आहे. पण त्या प्रक्षोभाचा, उग्र संघर्षणाचा फारच थोडा भाग प्रस्तुत कादंबरीच्या वांट्याला आला आहे. एका देशव्यापी आंदोलनाच्या चित्रणाऐवजी योगायोगाने राजकारणांत सापडलेला नायक व त्याच्या टोळींतील दोन-तीन व्यक्तींनी केलेलीं कांहीं फुटकळ साहसीं कृत्यें एवढेंच या कादंबरींत राजकारण आढळतें. काकोडकरांच्या या दोन्ही कादंबऱ्यांचा परिसर गोमंतकाचाच आहे. कथासाहित्याचें प्रादेशिक वळण गोमंतकापासूनच सुरू झालें. कादंबरीच्या क्षेत्रांत या प्रादेशिकतेला आजकाल बरेंच महत्त्व आलें आहे. प्रादेशिक हा शब्दहि बऱ्याच सैलपणें वापरला जातो. विवक्षित भूभागाचें, तेथील लोकाचारांचें अधूनमधून येणारें वर्णन आणि भूविशिष्ट भाषेंतील लकबांची योजना एवढ्याने एखादी कथाकादंबरी प्रादेशिक ठरविली जाते. त्या दृष्टीने काकोडकरांच्या या दोन्ही कादंबऱ्यांना प्रादेशिक म्हणतां येईल. ( लेखकाचा मात्र तसा अट्टाहास कुठे प्रकट झाला नाही हें नमूद केलें पाहिजे. ) वास्तविक या तथाकथित प्रादेशिकतेला आपण जेवढें महत्त्व देतों तें योग्य आहे काय ? मूलभूत मानवी प्रवृत्तींवर विशिष्ट भूप्रदेशाचा कलादृष्ट्या विशेष लक्षांत घेण्यासारखा कांहीं परिणाम होतो काय ? आणि तसा तो होतो हें मान्य केलें तरी आजच्या यांत्रिक व दळणवळणाचीं साधनें विस्तारत चाललेल्या युगांत हें प्रादेशिकतेचें कवच कितपत अभंग राहिलेलें आहे ? इत्यादि प्रश्न बाजूला ठेवले तरी विशिष्ट भूभाग व तेथील मानवी जीवन यांत प्रस्थापित झालेल्या संबंधांत कलादृष्ट्या कांहीं लक्षणीय नसेल तर ती प्रादेशिकता लक्षणीय ठरणार नाहीं.

त्या दृष्टीने श्री. र. वा. दिघे यांचा प्रयत्न निःसंशय अधिक कसोशीचा आहे. केवळ प्रादेशिक म्हणून नव्हे, तर १९५८ मधील एक लक्षणीय कादंबरी म्हणूनहि श्री. दिघे यांच्या ' पड रे पाण्या !' या कादंबरीचें महत्त्व आहे. कलाविष्काराचें माध्यम म्हणून कादंबरी या प्रकाराला महत्त्व देणाऱ्या आजच्या लेखकांत श्री. दिघे यांना अग्रस्थान द्यावें लागेल. वेगापेक्षा त्यांचें या क्षेत्रांतील सातत्यच आज घटकेला महत्त्वाचें आहे. ' पड रे पाण्या ! ' ही दिघे यांची पांचवी कादंबरी. श्री. दिघे यांच्या इतर कादंबऱ्या वाचून निर्माण झालेला ग्रह ही कादंबरी वाचून दृढच होतो. विशिष्ट भूप्रदेश, त्या भूप्रदेशाच्या कुशींत वाढणारी व तेथील वाऱ्या-

वादळांत, ऊनपावसांत विशिष्ट निष्ठेने जीवन जगणारीं माणसें, त्यांचे परस्पर संबंध, ज्ञान-अज्ञान, सुखदुःखें, क्षुद्र हेव्यादेव्याबरोबरच त्यांच्या ठिकाणी असलेली अंगभूत माणुसकी या सर्वांचा बहुरंगी पट दिघे तन्मयतेने रंगवितात. हीं माणसें जितकीं जिद्दीचीं, बलदंड व बोलभांड तितकींच उदार, परोपकारी व कनवाळूहि असतात. रागाच्या आवेशांत झपाट्याने खून करणारीं हीं माणसें स्वतःच्या जमिनीवर व भोंवतालच्या निसर्गावर प्रेम करतांना फुलापेक्षाहि हळुवार होतात. कसल्याहि भयानक आपत्तींत त्यांची जीवननिष्ठा अढळच राहते. त्यांच्या वागण्या-बोलण्यांत एकप्रकारचा प्राकृतिक जोष आढळतो; आणि त्यामुळेच त्याला कधी कधी विलक्षण उद्रेकी स्वरूप प्राप्त होतें. दिघे यांच्या कादंबऱ्यांतील घटनाप्राबल्याचें व त्यांतील उग्रतेचें कदाचित् हें कारण असावें; किंवा निसर्गशक्तीचा तो एक अपरिहार्य परिपाक असावा. निसर्गसौंदर्याचें सूक्ष्म, तरल संवेदन व त्याचा गहिरा आविष्कार हा त्यांच्या लेखनाचा एक विशेष पूर्वपरिचितच आहे. एखादी वन्य कन्या व तिचा रोमान्स, खून आणि कोर्टाचा देखावा इत्यादि घटकहि त्यांच्या कादंबऱ्यांत ठरीवपणें येतात. आणखी एक घटक त्यांच्या कादंबऱ्यांत येतो आणि तो म्हणजे शहरी सुशिक्षित व त्याने स्वतः-कडे घेतलेली या विशिष्ट जीवनाच्या भाष्यकाराची भूमिका. शेरे मारणें, तुलना करणें, तात्पर्य सांगणें; आवश्यक व अनावश्यक शास्त्रीय 'माहिती' पुरविणें इत्यादि कामें या पात्राकडून करवून घेतली जातात. श्री. दिघे यांच्या वृत्तींत कलात्मक प्रेरणेइतकीच ही दुसरी प्रचारात्मक प्रेरणाहि प्रबल आहे; ती वेळीं-अवेळीं आपलें डोकें वर काढते आणि कलात्मकतेची हानि करते.

सुदैवाने 'पड रे पाण्या !' या कादंबरींत हा भाग फार थोडा आला आहे. कादंबरीचा नायक संतू मगर यावरच सारें लक्ष केंद्रित केल्याने अवांतर गोष्टी मागे पडल्या आहेत. या कादंबरीचा नायक संतू मगर हा 'Saint Commoner' कसा आहे, हें दाखविणें हेंच या कादंबरीचें उद्दिष्ट. संतूच्या व्यावहारिक व आध्यात्मिक जीवनाचे पैलू उलगडत उलगडत एका वरच्या पातळीवर कादंबरीचा शेवट केला आहे. महाराष्ट्रांतील एका वारकरी शेतकऱ्याचें हें एक उदात्त चरित्र; या चरित्र-निवेदनाच्या निमित्ताने लोकसाहित्याची खैरातच या कादंबरींत केली आहे; ती वाजवीहून थोडी जास्त झालेली असली तरी तीमुळे कादंबरीच्या रसवत्तेंत एकंदरीने भरच पडली आहे. संतूचें व्यक्तित्व मात्र उदात्ततेची डूब देण्याच्या भरांत कांही ठिकाणीं कृत्रिम ( affected ) झालें आहे. संतूच्या आईचें—कोयनाबाईचें—चित्रण म्हणजे या कादंबरींतील बावनकशी सोनें. या कादंबरीच्या अंतिम मूल्यमापनाबाबत मतभेद होण्याची शक्यता लक्षांत घेऊनहि १९५८ च्या कादंबरी-वाङ्मयांत भर घालणारी एक तोलदार कृति असेंच तिचें वर्णन करणें योग्य होईल.

अशाच तोलामोलाची दुसरी एक कादंबरी म्हणजे श्री. पु. भा. भावे यांची 'वर्षाव.' ही. दिघे यांच्याप्रमाणेच कादंबरी या वाङ्मयप्रकाराचा कस लक्षांत घेऊन श्री. भावे यांनी ही कादंबरी लिहिली आहे. आत्मनिवेदनात्मक लेखनपद्धति भावे यांची विशेष आवडती. तिचाच जिव्हाळ्याने वापर करून समाजदृष्ट्या 'पतित' ठरलेल्या एका स्त्रीविषयीच्या आठवणींचा भावगाथा या कादंबरींत त्यांनी उलगडून दाखविला आहे. एक अविवाहित विद्यार्थी व विवाहाच्या नात्याने पौरुषहीन व्यक्तीशीं जन्माने बांधली गेलेली एक स्त्री यांचें परस्पर आकर्षण हा विषय एखाद्या सामान्य कादंबरीकाराने उथळपणें, उत्तानपणें तरी हाताळला असता किंवा त्यावर भावविवशतेचीं, बोधाचीं पुटें तरी चढविलीं असतीं. असला विषय अतिसामान्य किंवा अतिउदात्त होण्याचा धोका फार. श्री. भावे यांनी हा धोका टाळला आहे एवढेंच नव्हे तर,

त्याचें एका समर्थ कलाकृतींत रूपांतर केलें आहे. वास्तवाची पातळी न सोडतां पण अभिरुचि-दृष्ट्या हीनतेचा स्पर्शहि होऊं न देतां या संबंधांतील सारे प्रश्न, त्यांची तात्त्विक व व्यावहारिक बाजू अतिशय संयमाने पण आवश्यक तेवढ्या धारदारपणें भावे यांनी मांडली आहे; आणि तीहि कोणत्याहि प्रकारचें उपरें भाष्य न करतां; मोजकीं पात्रें, आवश्यक तेवढ्याच घटना, भावेच्या संवादी आंदोलनें, आशयाशीं राखलेलें इमान यांच्या जोरावर स्त्रीपुरुषसंबंधांतील नेहमींचेंच आणि तरीहि नेहमीच्या संबंधाच्या अतीत असलेलें असें कांहीं मूलगामी भावदर्शन या कादंबरींत घडतें. म्हणूनच १९५८ च्या यशस्वी कादंबऱ्यांत हिचा आवर्जून उल्लेख करावयास हवा.

यशस्वी म्हणून नव्हे पण मांडणीची थोडी वेगळी दिशा दाखविणाऱ्या कादंबऱ्या म्हणून ज्ञानेश्वर नाडकर्णी यांच्या ‘ कोंडी ’ व क. दि. सोनटक्के यांच्या ‘ जिद्द ’ या कादंबऱ्यांचा विचार करावयास पाहिजे. एकाच व्यक्तिजीवनांतील कारुण्यावर प्रकाश टाकण्याचा हेतु, या प्रकाशयोजनेला पोषक होईल इतपतच इतर पात्रांचा वापर, निवेदनांतील मोजकेपणा इत्यादि बाबतींत या दोन्ही कादंबऱ्यांत साम्य असलें तरी व्यक्तिजीवनामागील प्रेरणांची संगति शोधण्याचा ‘ कोंडी ’तील प्रयत्न अधिक लक्षणीय आहे. “ निवेदनाची पातळी विशिष्ट स्वभाव-चित्रांच्या बौद्धिक कुवतीच्या आसपास ठेवण्याची ” तात्त्विक जाणीव व तसा कसोशीचा प्रयत्नहि येथेच आढळतो. सामान्य वातावरणांत वाढलेल्या पण एका वेगळ्या प्रकृतीच्या व्यक्तीचें चित्र किंवा चरित्र उठावदारपणें मांडण्याचा नाडकर्णींचा हेतु आहे. त्यांच्याच भाषेंत सांगावयाचें तर “ एका सामान्य जीवनाची असामान्य कहाणी ” त्यांना रंगवावयाची आहे. हें असामान्यत्व एका सामान्याचें आहे व त्याचें प्रकटीकरण दबलेल्या स्थितींतच होणें स्वाभाविक आहे, हें मान्य करूनहि या व्यक्तीच्या सामान्यत्वाची जेवढी प्रतीति येते, तेवढी असामान्यत्वाची येत नाही. सामान्यत्वाच्या व असामान्यत्वाच्या रंग व रेषा एकमेकांत मिसळून एक वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तित्व साकार व्हावयास पाहिजे, पण तसें तें होत नाही. सूचकतेऐवजीं अलगपणा आल्याने लेखकाला जें जाणवलें तें परिणामकारकरीत्या प्रकट होऊं शकलें नाही.

श्री. सोनटक्के यांना जीवनांतील कांही निष्ठांशीं अपवित्र तडजोड न करतां, प्रामाणिक जीवन जगूं इच्छिणाऱ्या एका समंजस व्यक्तीचा भोंवतालच्या जीवनांतील विकृतीमुळें झालेला पराभव चित्रित करावयाचा आहे आणि तोहि साध्या प्रांजळ निवेदनांतून. या सरळ निवेदना-बरोबरच कथेवरील आपली पकड यत्किंचितहि ढिली होऊं नये असा प्रयत्न श्री. सोनटक्के कटाक्षाने करतात. ही पकड वाजवीहून थोडी अधिक झाल्याने व दुय्यम व्यक्तींचें चित्रण यशस्वी होऊनहि मुख्य पात्राच्या चित्रणांत कच्चेपणा राहिल्याने कादंबरीला अपेक्षित यश मिळूं शकलेलें नाही. तथापि सांकेतिक निवेदनपद्धतीपासून ती अलिप्त असल्याने तिचें वेगळेंपण जाणवतें. आणखी एक वेगळी वाटणारी कृति म्हणजे श्री. जदुनाथ थत्ते यांची ‘ दयाळ ’ ही. बालमनावर विशिष्ट संस्कार करण्याच्या हेतूनेच तिची निर्मिति झाली असली आणि प्रचाराला तींत प्राधान्य असलें तरी प्रचाराची पातळी उच्च आहे. विषयदृष्ट्याहि ती एकदम वेगळी वाटते. बाकीच्या कादंबऱ्यांतून आलेल्या विषयांत प्रणयाला किंवा व्यक्तिजीवनांतील कुचंबणेला प्रमुख स्थान आहे.

१९५८ मधील स्वतंत्र आणि ठळक ( निःशेष नव्हे ) कादंबऱ्यांचा विशेष हा असा आहे. तो पाहतांना शेवटीं हातीं लागते ती या क्षेत्रांतील अत्यल्प कामगिरी व तिची बोचक जाणीव. ● ● ●

५

प्रा. वसन्त कानेटकर, एम्. ए.

# नाट्यवाङ्मय

१९५८ जानेवारी ते डिसेंबर या कालावधींत प्रसिद्ध झालेल्या प्रमुख नाट्यकृतींचा मी आज परामर्श घेणार आहें. गेल्या एकदोन वर्षांतच मीं नाट्यलेखनाशीं विशेष सलगी केली असली तरी रंगभूमीच्या दरबारांत नाटककार, कलाकार वा टीकाकार या नात्यानें 'निवाडा' करण्याचा कोणताहि अधिकार माझ्याजवळ नाही. नाट्यलेखन आणि रंगभूमि यांवर प्रेम करणाऱ्या एका रसिक वाचकाच्या भूमिकेवरून शोधमंथन करण्याचा हा एक प्रयत्न आहे.

गेल्या वर्षांत पुस्तकरूपानें (मला उपलब्ध झालेल्या) नाटकांची संख्या अजमासें पंचवीसच्यावर तरी खचितच जाईल. त्याखेरीज गांवोगांव प्रयोगरूपानें सादर होणारीं पण हस्तलिखितस्वरूपांतच पडलेलीं अनेक नाटकें असणें शक्य आहे. निरनिराळ्या नाट्यमहोत्सवांमुळे असो, राज्यनाट्यस्पर्धेमुळे असो, कराच्या मगरमिठींतून रंगभूमि मुक्त झाल्यामुळे असो वा प्रेक्षकांच्या बदलत्या अभिरुचीमुळे असो, पण गेल्या कांही वर्षांत रंगभूमीच्या वठूं लागलेल्या वृक्षाला नवा मोहोर येऊं लागल्याचें सुचिन्ह दिसत आहे. हा मोहोर अकालींच झडणार आहे की त्यांतून श्रेष्ठ कलाकृतींचीं मधुर फळें हातीं लागणार आहेत, याचा निर्णय कालांतरानेंच होऊं शकेल. पण जिच्या आधारानें नव्या नव्या नाट्यकृति फुलाफळाला येत आहेत त्या रंगभूमीवरील अनेक प्रकारच्या स्थित्यंतरांची नोंद जाणत्या समीक्षकांनी घेतली पाहिजे. उदाहरण म्हणून मी एकच वस्तुस्थितीचा निर्देश करतों. गेल्या कांही वर्षांत हौशी कलावंतांच्या अनेक संस्था कलेच्या दृष्टीनें विविध धाडसी आणि प्रगल्भ प्रयोग करून मराठी रंगभूमीला निरनिराळ्या जीर्ण संकेतांच्या शृंखलांतून मुक्त करूं पाहत आहेत. पण त्यांची संभावना मात्र 'श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्माभिमानी' कडव्या कर्मठपणानेंच करीत आहेत. नवनिर्मिति आणि कर्मठपणा यांतील झुंज हें दृश्य वाङ्मयेतिहासाच्या अभ्यासकाला नवें नसलें तरी कलेच्या अभिवृद्धीच्या दृष्टीनें तें स्पृहणीय आहे असें खचितच मानतां येणार नाही.

या वर्षांतील नाट्यलेखकांच्या यादींत रांगणेकर, दांडेकर, देशपांडे, तेंडूलकर, बाळ कोल्हटकर, कानेटकर, अण्णाभाऊ साठे, इ० प्रथितयश लेखकांच्या जोडीला कै. न. चिं. केळकरांचें अपुरें नाटक पुरें करणारे त्यांचे पुत्र श्री. का. न. केळकर, तसेंच पटकथाकार दिनकर पाटील, कवि पु. शि. रेगे आणि इतर अनेक नवे लेखक यांचीं नांवें समाविष्ट होतात. या नाटककारांनी लिहिलेल्या बहुसंख्य नाट्यकृतींचें रूप न्याहाळतांना प्रथमदर्शनींच एक विशेष चटकन नजरेंत भरतो. या वर्षांत प्रसिद्ध झालेलीं पुष्कळशीं नाटकें कनिष्ठ (वा क्वचित् उच्च) मध्यमवर्गीय पांढरपेशा समाजाचें जीवन चित्रित करणारीं आहेत. बहुतेक नाट्यप्रसंग सोफासेट वा पेशवाई बैठक घातलेल्या दिवाणखान्यांत घडलेले आहेत. पांढरपेशांच्या श्रद्धा, निष्ठा, संस्कृति, त्यांचीं स्वप्नें, ध्येयें, नीति आणि नातीं आणि त्यांचीं सुखदुःखें हीं सर्व कमीअधिक कलात्मक रूपांत पण दिवाणखान्याच्या चौकटींतच (ही 'चौकट' हा एक अटळ संकेत मानायचा काय?) प्रकट झालीं आहेत. अर्थात् त्यांच्या प्रेरणा आणि जन्महेतु निरनिराळे आहेत.

सौ. मालतीबाई बेडेकरांचें 'अलौकिक संसार' आणि गोविंदस्वामी आफळे यांचें 'दं बायको ना त्याची?' हीं दोन्ही नाटकें पुरुषपात्रविरहित आहेत; आणि पुरुषपात्रविरहित

अनुक्रमणिका

नाटकें 'जशीं आणि जितपत' असायचीं 'तशीं आणि तितपतच' हीं नाटकें आहेत. निकडीच्या मागणीपायी घाईने लिहिल्यामुळे असेल, पण गोमंतकांतील चळवळीच्या पार्श्वभूमीवर एका मानिनीची कौटुंबिक कथा उभी करणाऱ्या 'अलौकिक संसारांत' मालतीबाईंचें 'विभावरीपण' तिळमात्रहि दिसत नाहीं. त्यामुळेच शंका येते की दुसऱ्याच कोणा 'मालतीबाईचें' तर हें नाटक नव्हे ना? कच्च्या फिल्मचा परवाना मिळेपर्यंतच्या अवधींत आपण 'पैसे झाडाला लागतात' हें नाटक लिहिलें असल्याचें दिनकर पाटलांनी कबूल केलें आहे. बहुधा त्यामुळेच चित्रपटांतील कच्चा मालमसाला एकत्र करून चटकदार संवादांच्या साहाय्याने (आणि 'स्टारकास्ट'च्या मदतीने) त्यांनी रंगभूमीवर हें 'पैशाचें झाड' लावलें असावें. प्रेक्षकांना प्रिय असा प्रतिगामी दृष्टिकोन, अतिरंजित कृत्रिम घटना, उथळ विनोद, भडक प्रणय आणि सवंग कारुण्य म्हणजे 'पैसे झाडाला लागतात' हें नाटक होय.

पांढरपेशा स्त्रीने आर्थिक दृष्ट्या स्वावलंबी झालें पाहिजे हें तत्त्व सांगणारें उमाबाई भटांचें 'पत्त्यांचा बंगला' आणि बालकांच्या शिक्षणसंगोपनांत नव्याजुन्या दृष्टिकोनांचा समन्वय झाला पाहिजे हा सिद्धान्त प्रतिपादणारें रामतीर्थकरांचें 'नवी दृष्टि' हीं उघड उघड बोधवादी पण निःसत्त्व नाटकें आहेत. 'बाळ गंगाधर' हें नांव धारण करणाऱ्या लेखकद्वयांनी लिहिलेल्या 'पिंजऱ्याच्या खिडकींत' एक रहस्य आहे, एक अपघात आहे, भयगंडासारखी एक मनोविकृति आहे, आणि माफक प्रमाणांत प्रेमाची गुंतागुंतदेखील आहे. पण म्हणूनच घटकाभर करमणुकीपलीकडे त्यांत कांहीहि नाही. अच्युत बर्वे यांचें 'लाखेचे मणी' हें नाटक धनिकांचे आणि गरिबांचे पीळ यांतील संघर्ष उभा करतें; पण ओघवते संवाद, सूक्ष्मावलोकन आणि चित्रणचातुरी यांचें कसब बर्व्यांच्या लेखणींत असूनहि त्यांची नाट्यकथा घोपटमार्गाने नेहमीचे उलटसुलट टप्पे घेत नाटकी पद्धतीने (बॅग हातांत घेऊन घराबाहेर पडणाऱ्या नायिकेबरोबर) संपते. सावंतांची 'जन्माची गांठ', जोशींचे 'नांवाचे मोठे', जावकरांचें 'अठरा वर्षांनंतर' आणि पेडणेकरांचें 'आम्ही दोघे' या नाटकांत एक एक समस्या उभी करण्याचा यत्न आहे; पण सांकेतिक प्रणय, खलनायकांच्या वा दैवदुर्विलासाच्या दुष्टाव्यामुळे ओढवलेले करुण वा रौद्र प्रसंग, पिता-पुत्र-बंधुप्रेमाचीं ठरीव आवर्तनें, त्यागाचीं भडक चित्रें आणि पात्रांचीं आकस्मिक परिवर्तनें यांमुळे रंगभूमीवर तीं रंजक वाटत असलीं तरी कलादृष्ट्या तीं निस्तेज वाटतात.

या सर्व नाटकांत रांगणेकरांचें 'अमृत' आणि तेंडुलकरांचें 'मधल्या भिंती' हीं दोन नाटकें सघन आशय आणि कलापूर्ण आविष्कार या दृष्टीने उठून दिसतात. या दोन्ही नाटकांची रचना एकाच विषयाभोवती झाली आहे. दोन्ही नाटकांत पांढरपेशांना चिरपरिचित असा सासूसुनेचा संघर्ष आणि त्यांत चिमटलेल्या नायकाची कुचंबणा चित्रित केलेली आहे. नाट्यवस्तूचें वेगवेगळें अनुसंधान राखून दोन्ही नाटकांतून मातेच्या अहंकारी वात्सल्याचें रौद्र दर्शन लेखकांनी घडवलें आहे. मात्र 'अमृत'मधली आई आणि 'मधल्या भिंती'तील पार्वती या मूलतःच वेगवेगळ्या मनोधर्मांच्या व्यक्तिरेखा आहेत. जयंताने लग्नच करूं नये असला चमत्कारिक (आणि अस्वाभाविक देखील) आग्रह 'अमृत'मधली आई धरते, तर सदाने आपल्या पसंतीच्या कालिंदीशींच लग्न केलें पाहिजे असा 'मधल्या भिंती'-तील पार्वती हट्ट धरते. जयंत आणि सदा आपआपल्या मातांच्या इच्छा तुडवून स्वतःच्या मर्जीप्रमाणे लग्नाचा प्रश्न सोडवतात तेव्हा दोन्ही नाटकांत उग्र संघर्ष जन्माला येणें अपरिहार्य होतें. जयंताची आई वरकरणी सौम्य पण जालीम उपायाने मुलावरलें आपलें स्वामित्व राखूं पाहते, तर पार्वती सदाशीं असहकार पुकारून त्याच्या पत्नीचा छळ आरंभिते, रांगणेकरांच्या

नाटकांतील सून तितक्याच जिद्दीची तरुणी आहे. त्यामुळे स्त्रीत्वाचे अनेक उग्र विशेष दृष्टींत भरतात. 'स्वामित्वा'साठी चाललेल्या सासूसुनेच्या संघर्षाला उघड उघड रणांगणाचें रूप येतें. हा संघर्ष रांगणेकरांनी इतक्या सूक्ष्मपणें आणि हृदयस्पर्शी रीतीने रेखाटला आहे की, त्यामुळेच कांही उत्कट क्षणीं आपण स्त्रीचें सर्वंकष विराट रूपच पाहत आहोंत असा प्रत्यय येतो. मात्र आईला विषप्राशन करायला लावून रांगणेकरांनी ज्या नाटकी रीतीने या करुणरौद्र कहाणीची विल्हेवाट लावली आहे त्यामुळेच एका संपन्न अनुभवाचें निर्माल्य होतें. रांगणेकरांच्या नाटकांना त्यांच्या विशिष्ट प्रकृतिधर्मामुळे (आणि पेशामुळेहि) पडणाऱ्या एरवीच्या मर्यादा इथेहि आहेत. तरीपण सोपीं, सुटसुटीत आणि सुबक नाटकें लिहिणारे रांगणेकर 'धाकटी आई' या नाटकापासून 'कात टाकूं' लागले आहेत ही जाणीव या नाटकाने दृढ होते यांत शंका नाही.

'मधल्या भिंती' हें नाटक मुख्यतः पार्वती या अहंकारी आणि आत्मकेंद्रित स्त्रीची करुण कहाणी आहे. तिच्या मनोधर्मांचें विश्लेषण आणि त्यांचा कलात्मक आविष्कार तेंडुलकरांनी कमालीच्या कौशल्याने आणि पांढरपेशांच्या कौटुंबिक सुखदुःखांच्या वास्तव चौकटींत केला आहे. तीन खोल्यांच्या ब्लॉकमध्ये आपल्या जुन्या श्रद्धा, जुनीं स्वप्नें गोंजारीत आणि परिस्थितीने लादलेलीं हरतऱ्हेचीं वैफल्यें पिंजत वर्षानुवर्षे जगणारें एक कुटुंब तेंडुलकरांनी या नाटकांत वेचकदृष्टीने टिपलें आहे. आर्थिक ओढग्रस्तीने गांजलेल्या पांढरपेशांचे सगळे पीळ आणि त्यांचीं सगळीं वांझ स्वप्नें हा तेंडुलकरी लेखनाचा खास प्रांत. मात्र एवढ्या-मुळेच पांढरपेशांचें तेंडुलकरी चित्रण एकेरी वाटतें. त्रासलेलीं, कावलेलीं, खचलेलीं त्यांचीं पांढरपेशी माणसें सदोदित खुज्या पिळून पिळून ताणलेल्या अवस्थेंत अवतरतात आणि मावळतात. असल्या कुटुंबांच्या कोंदणींत केवळ वर्चस्वभावनेनेच जन्मभर पतिपुत्रांच्या खस्ता खाणारी आणि कष्ट उपसणारी पार्वती लेखकाने सुबकतेने बसवली आहे. पार्वतीचा अहंकार, त्याची दुखावणी तेंडुलकरांनी पहिल्या अंकांत जितक्या समर्थपणें मांडली आहे तितकेंच या अहंकारी वात्सल्याचें तांडव दुसऱ्या आणि तिसऱ्या अंकांत त्यांनी प्रभावी रीतीने केलें आहे. अखेर या आत्मकेंद्री आणि अहंकारी स्त्रीमधली वत्सलता जागी होते ती देखील तिच्या वर्चस्वभावनेला मिळालेल्या दुसऱ्या एका आव्हानामुळेच. पार्वतीच्या स्वभावाला मिळालेली शेवटची कलाटणी जितकी नाट्यपूर्ण तितकीच तिच्या मनोधर्माशीं अत्यंत सुसंगत आहे यांत शंका नाही. पण त्यासाठीं वापरण्यांत आलेल्या युक्तीमुळे (Device) या सुंदर कलाकृतीला गालबोट लागलें आहे. स्वतःच्या बदनामीने प्रियकराचें संसारसौख्य साधूं पाहणारी शालिनी आणि त्यावर उभारलेलें तिचें कपटनाट्य गडकऱ्यांच्या 'पुण्यप्रभावांत' वा 'एकच प्याल्यांत' कदाचित शोभून दिसेल. 'मधल्या भिंती' सारख्या शंभर टक्के वास्तव-प्रधान नाटकांत असल्या क्लृप्ति कलाकृतीची पातळी तत्काल खाली खेचतात. तेंडुलकरांच्या लेखनशैलीचाहि या संदर्भात उल्लेख करणें आवश्यक आहे. त्यांचे संवाद त्रोटक आणि त्रुटित उद्‌गारांनी बांधले जातात. त्या उद्गारांतील ताण क्षणाक्षणाला जाणवतो. सूचक, भेदक क्षणांत वा थंड्या युद्धाच्या प्रसंगीं त्यांच्या अर्ध्यामुर्ध्या शब्दांनीहि चांगली धार येते. पण हे अर्धेमुर्धे शब्द वा त्रुटित त्रोटक उद्‌गार सरोस पानेंच्या पानें व्यापूं लागले की तेंडुलकर दुर्बोधच नव्हे तर रूक्ष नि रसापकर्षकहि लिहूं लागतात. यामुळेच नाजूक, सुंदर वा भव्य कल्पनाहि शब्दांच्या कोयत्याने छिन्नविच्छिन्न होऊन प्रेक्षकांच्या पदरांत पडतात. भावपूर्ण प्रसंगाच्या चित्रणांतील एकाच भावनेचें, शब्द बदलून रवंथ केल्यासारखें पुनः पुनः होणारें आवर्तन ही तेंडुलकरांच्या लेखनाची एक दुर्दैवी लकब म्हणून उल्लेखिणें जरूर आहे. ही

अनुक्रमणिका

लकब इतकी चमत्कारिक आहे की, त्यामुळेच त्यांचें नाटक आपल्या स्वाभाविक गतीने पुढे सरकत नाही आणि कापूस पिंजल्यासारखी मनोव्यथांची नुसती पिंजण सुरू होते. यासारखे दोष इतक्या विस्ताराने एवढ्याचसाठी सांगायचे की 'नधल्या भिंती' या नाटकाची गणना या वर्षातल्या उत्कृष्ट नि दर्जेदार कलाकृतींत निश्चितपणें करावी लागेल.

पु. ल. देशपांडे यांचें 'सुंदर मी होणार' हें या वर्षातील आणखी एक महत्त्वाचें नाटक. ब्राउनिंग पतिपत्नींच्या जीवनचरित्रांतील एका पर्वावर आधारलेल्या रुडॉल्फ बॅझीयरच्या 'बॅरट्स् ऑफ विंपल स्ट्रीट' या विख्यात नाट्यकृतीचें 'सुंदर मी होणार' हें भाषांतर वा रूपांतर नव्हे. परंतु रूपांतर वाटावें इतकें रंगरूपाने त्याशीं मिळतें जुळतें खचित आहे. परकीय नाट्यकृतींना बेमालूम एतद्देशीय पेहराव चढविण्यांत देशपांड्यांचा किती हातखंडा आहे हें 'अंमलदार' वा 'भाग्यवान्' या नाटकांनी सिद्ध केलें आहे. परंतु 'सुंदर मी होणार' या नाटकाच्या बाबतींत मात्र त्यांची झेप चुकल्यासारखी वाटते. 'संजय म्हणजे ब्राउनिंग नव्हे आणि दिदी म्हणजे एलीझाबेथ नव्हे' हें त्यांनी स्वतःच सांगून टाकलें आहे. पण नाटक वाचल्यावर अनुभव येतो तो असा की, 'संजय म्हणजे कवि नव्हे आणि दिदी म्हणजे कवयित्री नव्हे; नुसते काव्याभ्यास निर्माण करणारे अलंकारिक शब्द, शब्द आणि शब्द! शब्द वगळून उरलेल्या संजयमध्यें काकाजींचें (तुझें आहे तुजपाशी) प्रतिबिंब दिसूं लागतें आणि महाराजांच्यावर आचार्यांची सावली पडल्यासारखी वाटते. त्यांतहि वेबीराजांच्या फटकळपणाला फाजील वाव दिल्यामुळे महाराजांचा उग्र वचक देखील (मुळांतल्या तुलनेने) सपक झाला आहे. त्यामुळे सबंध नाटक वाचून झाल्यावर लक्षांत राहत असेल तर हलुवार हाताने रेखाटलेली डॉक्टरांची हृदयंगम व्यक्तिरेखा. देशपांड्यांचें संवादलाघवच नव्हे तर व्यक्तिचित्रणाचें आणि रसपरिपोष करण्याचें त्यांचें कसबहि इतकें दांडगें आहे की, अशा अनेक प्रकारच्या उणीवा दिसत असतांनाहि आजच्या आणि उद्याच्या या श्रेष्ठ नाटककाराने 'डाव्या हाताने' लिहिलेल्या या कलाकृतीचें देखील कौतुक करण्याचा मोह अनावर होतो.

श्रीकृष्ण साक्रीकरांच्या 'चला आळंदीला' या नाटकावर देखील एका इंग्लिश नाट्यकृतीची दाट छाया पडलेली आहे. विज्ञानाच्या शक्तीमागे पिसाटपणें धावणारी आजची जडवादी संस्कृति आणि तिला डोळस करून सावरू पाहणारा संतांचा भक्तिमार्ग यांतील विरोध हा भव्य विषय नाटककाराने निवडलेला आहे. ज्ञानेश्वरकालीन भागवत संप्रदायाच्या पार्श्वभूमीवर चांगा वटेश्वर आणि मुक्ताबाई यांची प्रतीकात्मक योजना करून लेखकाने आपल्या नाट्यवस्तूची उभारणी केली आहे. अशी उभारणी करतांना रूपा आणि मुंद्रा या जन्मांध भिकारी जोडप्यांच्या जीवनांत ज्या घटना लेखकाने कल्पिल्या आहेत त्या आयरिश नाटककार जॉन मेलिंग्टन सिंज याच्या 'दि वेल ऑफ दि सेंट्स्' या नाटकावरून घेतलेल्या आहेत. दोन्हीहि नाटकांत जन्मांध कुरूप भिकारी, त्यांना धर्मगुरूच्या कृपाप्रसादाने प्राप्त झालेली दृष्टि, दृष्टिलाभानंतर त्यांना परस्परांचें आणि म्हणून जगाचें झालेलें कुरूप दर्शन, तज्जन्य वैफल्य आणि अखेर त्यांनी खुशीने स्वीकारलेलें अंधत्व या घटना मांडलेल्या आहेत. मात्र या दोन्ही नाटकांची प्रकृति आणि पातळीहि अर्थात् वेगवेगळी आहे. सिंजची गाढ काव्यात्मकता, त्याचा बोचक उपरोध आणि सत्यशोधनाची त्याची तळमळ इत्यादि गुणविशेष साक्रीकरांच्या पिंडाशीं मुळीच जुळणारे नाहीत. त्यांचा पिंड मूलतःच भाविक भक्ताचा आहे. त्यामुळे सिंजच्या घटना उचलून अगदी वेगळ्याच संदर्भात आणि लक्ष्यार्थांत त्यांनी मांडलेल्या आहेत. मात्र दैहिक दृष्टि म्हणजे विज्ञानाचें भौतिक सामर्थ्य हें त्यांनी मानलेलें समीकरण मुळांतच ढिसाळ असल्याने अनेक प्रसंगीं भारतीय अध्यात्मवादाच्या नांवाखाली लेखक प्रारब्धवादाचें तर मंडन करीत नाही ना अशी

शंका येऊं लागते. दृष्टिलाभामुळे एकदा आलेलें वैफल्य, पुन्हा अंधत्व पत्करूनहि नाहीसें होत नाहीं, हें सुचविण्यांत सिंजने जीवनांतील एका फार मोठ्या सत्याला स्पर्श केला आहे. साक्रीकरांनी मात्र हा प्रश्न शिताफीने डावललेला आहे.

साक्रीकरांच्या भाविकतेच्या बरोबर विरुद्ध असा शुद्ध भौतिकवादी आणि बुद्धिवादी दृष्टिकोन श्रीकृष्ण किर्लोस्कर यांनी आपल्या ' चार्वाक ' या ऐतिहासिक नाटकांत मांडलेला आहे. व्यासप्रणीत प्राचीन धर्म, तत्त्वज्ञान जीवनपद्धति आणि चार्वाकप्रणीत बुद्धिवादी भौतिक तत्त्वज्ञान आणि जीवनमार्ग यांतील संघर्ष आणि चार्वाकाची शोकांतिका शक्य तितक्या सुगम संवादांतून परिणामकारक रीतीने मांडण्याचा त्यांनी यत्न केला आहे. कलात्मकतेच्या दृष्टीने या नाटकांत पुष्कळच उणीवा दाखवितां येण्यासारख्या आहेत. तरी देखील विचारप्रवर्तक नाट्य-लेखनाचा एक प्रयत्न म्हणून या कृतीचें स्वागत करणें जरूर आहे. ' चार्वाक ' आणि ' चला आळंदीला ' हीं दोन्ही नाटकें ऐतिहासिक कथावस्तूवर उभीं असलीं तरी त्यांना शुद्ध ऐतिहासिक नाटकें असें संबोधतां येणार नाही इतकें त्यांत वर्तमानकाळांतील विचारसंघर्षाचें प्रतिबिंब पडलें आहे. गोखले यांचें ' अनंत फंदी ' आणि चव्हाणांचें ' मुजऱ्याचे मानकरी ' हीं खऱ्या अर्थाने ऐतिहासिक नाटकें म्हणतां येतील. हीं दोन्ही नाटकें आणि नार्वेकरांचें ' जयमाला ' आणि केळकर पितापुत्रांचें ' जंगल मे मंगल ' हीं दोन कल्पनारम्य नाटकें यांत केवळ जुन्या नाटकांचे पडसादच असल्याने नांवाजण्यासारखें कांहीहि नाही. बाळ कोल्हटकरांचें ' आकाशगंगा ' हें अद्‌भुतरम्य नाटक एक अयशस्वी पण महत्त्वाचा प्रयोग म्हणून उल्लेखिणें जरूर आहे. लेखकाच्या कल्पकतेची तरलता आणि झेप पहिल्या अंकांत चांगल्या रीतीने प्रत्ययास येते. पण पुढल्या दोन अंकांत मानवी समस्या नजरेआड होतात आणि चुरचुरीत राजकीय टीका आणि उथळ भावनाविष्कार यांचा सुकाळ होतो. त्यामुळेच या नाटकाची पातळी खाली आल्यासारखी वाटते.

कारंड्यांचे ' नवी वाट ', दांडेकरांचें ' शितू ' आणि अण्णाभाऊ साठ्यांचे ' इनामदार ' हीं तीन नाटकें ग्रामीण जीवनाचें विविधरंगी दर्शन घडविणारीं आहेत. यांपैकी ' नवी वाट '-मध्ये स्पृश्यास्पृश्य समाजांतील संबंध कसे सुधारतील हा प्रश्न ' सोडवण्यांत ' आलेला आहे. साठ्यांच्या ' इनामदारांत ' भ्याड, सुखलोलुप आणि दगाबाज इनामदार, त्याने नाडलेलीं गरीब कुळें यांतील संग्राम वर्गकलहाच्या पार्श्वभूमीवर रेखाटण्यांत आला आहे. वर्गकलहाला अभिप्रेत असलेल्या रक्तरंजित क्रांतीचें दर्शन घडविण्यासाठीच की काय, पण या नाटकांत अनेक सगससणाटी खून पेरलेले आहेत. मार्मिक निरीक्षण, ओजस्वी संवादलेखन आणि प्रत्ययकारी व्यक्तिचित्रण इत्यादि अनेक गुण साठ्यांच्या लेखणींत असून साम्यवादी विचारसरणीचीं झापडें त्यांनी आपल्या कलादृष्टीवर चढवलेलीं असल्यामुळे, ते मांडीत असलेलें जीवनचित्र एकांगीच नव्हे तर अतिरंजितदेखील होऊं लागतें. दांडेकरांच्या 'शितू' ने कादंबरीचा परिसर ओलांडून रंगभूमीवर प्रवेश करतांच तिचें सगळें बाळसेंच झडल्यासारखें वाटूं लागलें आहे. नाटकाच्या स्वाभाविक मर्यादा कोकणच्या वातावरणांत अनेक लहानसहान प्रसंगांतून संथपणें विकसित होणाऱ्या 'शितू'-सारख्या भावकाव्यात्मक ( lyrical ) व्यक्तिचित्रणाला मानवलेल्या नाहीत. त्यामुळे एक शितू सोडली तर बाकी या नाटकांत पुष्कळ पुष्कळ वर्णन करतां येण्यासारखें असलें तरी नाटकाच्या चौकटींत मुख्य शितूच कोमेजली आहे.

या वर्षात प्रसिद्ध झालेल्या सर्व नाटकांत अगदी वेगळ्याच घाटाच्या आणि विलक्षण सामर्थ्याच्या तीन नाटिकांच्या एका संग्रहाकडे मी रसिकांचें लक्ष वेधूं इच्छितों. रूपकथ्थकाचा (पु. शि. रेगे) ' रंगपांचालिक आणि दोन नाटकें ' हाच तो संग्रह होय. या संग्रहांत

'माधवी–एक देणें', 'रंगपांचालिक' आणि 'कालयवन' हीं तीन नाटकें एकत्रित करण्यांत आलेलीं आहेत. त्यांना 'नाटक' म्हणण्यापेक्षा 'नाट्यकाव्य' म्हणणें अधिक युक्त होईल. कारण त्यांतील सघन आशयांत नाट्यगुणाइतकीच भावकाव्याची तरलता आणि उत्कटता आहे. विषय आणि आशय या दृष्टीने हीं नाट्यकाव्यें अभिनव तर आहेतच, पण मानवी जीवनांतील कांही उत्कट अनुभवांचें एक आगळेंच सर्वस्पर्शी आकलन, त्यांच्या आविष्कारांतील सूचकतेचें आणि संयमाचें सामर्थ्य आणि अनुभवांना शब्दरूप देतांना रंग, रेखा आणि नाद यांची सहजगत्या साधलेली एक हृदयंगम लय इ० गुणविशेष लेखकाच्या अव्वल दर्जाच्या प्रतिभेची साक्ष देतात.'माधवी-एक देणें' या नाटकांत कलावंताच्या प्रतिभेला मिळणारें आव्हान, निर्मितीच्या प्रक्रियेंत त्याच्या सर्व शक्तींची होणारी तन्मयता, कलापूर्तीच्या क्षणीं दाटून येणारे त्याचे हर्षखेद, तृप्ति आणि अतृप्ति यांतील त्याच्या अन्तःकरणाचे हेलकावे, काळाचीं बंधनें कापीत जाणारा त्याच्या प्रतिभेचा उन्मेष, आणि बंधनाच्या कोषांतच गुरफटणारें त्याचें लौकिक जीवन इत्यादिकांचें चित्र नाजूक हाताने रेखाटलेलें आहे. रूपदक्ष देवदत्ताच्या मनाला मोहिनी घालणाऱ्या तीन रूपवती स्त्रिया–कालिंगिका, सुतनुका आणि मलयवती म्हणजे कलानिर्मितीच्या प्रक्रियेंतील तीन शक्ति आहेत, तीन अवस्था आहेत हें लक्षांत घेतलें तर या नाटकाचें स्वारस्य समजण्यास मुळीच अडचण पडणार नाहीं. रंगपांचालिक या नाटिकेंत विराट-कन्या उत्तरा हिच्या कोवळ्या अन्त:करणांत बृहन्नडारूपी अर्जुनाबद्दल उद्भवलेल्या आणि पुढे कोमेजलेल्या अनुरागाचें हृदयस्पर्शी चित्र रंगवलेलें आहे. तारुण्यांत पदार्पण करणाऱ्या कला-सक्त उत्तरेच्या पहिल्या प्रीतीच्या सर्व छटा बिलक्षण उत्कटतेने इथे उमटलेल्या आहेत. रसरूप-गंध घेऊन रूपकथ्थकाचे पिळदार शब्द एका हृदयंगम लयींत फेर धरून प्रणयभावनेचे एक एक पदर उलगडूं लागले की, पुराणकालांतल्याच नव्हे तर युगायुगांच्या उत्तरेचें वैफल्य रसिक हृदयाला चटका लावून जातें. 'माधवी' आणि 'रंगपांचालिक' या दोन्ही नाट्य-कृतींपेक्षा 'कालयवन' हें प्रदीर्घ नाट्यकाव्य कितीतरी दृष्टीने अधिक सरस आहे. कृष्णकालीं मथुरेवर होणाऱ्या कोणा कालयवनाच्या सर्वनाशक स्वारीच्या भयाने प्रजेचीं मनें भयसंकुल झालीं आहेत आणि तरीहि तीं एका महोत्सवाच्या आनंदांत निमग्न आहेत. कृष्णाइतकीच आतुरतेने आणि थरकाप झालेल्या हृदयाने प्रजाजन कालयवनाचीहि वाट पाहत आहेत. कृष्ण हाच त्यांच्या भयाचें आणि आनंदाचें, रक्षणाचें आणि विनाशाचें निधान आहे. या पार्श्व-भूमीवर कुब्जा आणि राधा यांच्या अविचलित अथांग भक्तिप्रेमाची गाथा रूपकथ्थकाने गाइली आहे. भय म्हणजे काय, प्रीति म्हणजे काय, आनंद म्हणजे काय हे प्रश्न उपस्थित करून या अथांग भावनांचा तळ गाठण्याचा प्रयत्न केला आहे. या तिन्ही भावोर्मि मूलतः एकरूप आहेत हा कविमनाचा साक्षात्कार नाट्यपूर्ण संवादांतून त्याने प्रत्ययकारी केला आहे. भयाचे, भयाबद्दलच्या ओढीचे आणि म्हणून प्रेमाचे आणि दोन्हीमुळे आनंदाचे वेगवेगळे थर दाखवतांना काय, किंवा राधेच्या शब्दांत सांगावयाचें तर..."एकच शब्द पण नीट कळला, नीट मनांत ठसला, नीट वापरतां आला की तो स्वर्गांतहि कामधेनूसारखा होतो असं म्हणतात. तसंच कोणत्याहि अनुभवाचं. त्यांत मग सगळ्या विश्वाचं बीज सापडतं..." हें अनुभव-माहात्म्य वर्णन करतांना काय, अथवा कुब्जेच्या शब्दांत बोलायचं तर..."दुसरं कोणी नसतंच मुळी. आपणच सगळं कांही व्हायला पाहिजे." हें मनाची काजळी झाडून टाकणारें भेदक सत्य प्रतिपादन करतांना काय–रूपकथ्थकाच्या थोर जीवनदृष्टीचा साक्षात्कार झाल्या-वाचून राहत नाही. साहजिकच त्यामुळे 'रंगपांचालिक आणि दोन नाटकें' या नाट्य-

काव्यसंग्रहाचा या वर्षांतील नव्हे तर गेल्या कांही वर्षांतील सर्वश्रेष्ठ कलाकृति म्हणून मी उल्लेख केला तर आपण त्यांत अतिशयोक्ति मानूं नये.

या वर्षांतील प्रमुख नाटकांचें परीक्षण मी इथेच संपविणार आहें. पण तत्पूर्वी अलीकडेच गरम चर्चेचा विषय झालेल्या आणखी एका कलाकृतीचा निर्देश केल्याशिवाय ही मीमांसा पुरी होऊं शकत नाही; म्हणून मी त्याकडे केवळ उल्लेखापुरतेंच वळणार आहें. वसंत कानेटकर लिखित ' देवांचं मनोराज्य ' हीच ती नाट्यकृति होय. वृत्तपत्र-मासिकांतून, सभांतून आणि अनौपचारिक चर्चांतून, या नाटकाच्या प्रकाशनानंतर आणि प्रयोगानंतर विद्वान् टीकाकारांनी आणि सामान्य रसिकांनी भिन्नप्रकारच्या टोकाच्या प्रतिक्रिया व्यक्त केल्या आहेत. त्या प्रतिक्रियांची बरीवाईट धग अजूनहि पुरती विझलेली नाही. लेखक म्हणून माझ्यापुरतें बोलायचें, तर या नाटकांतील ज्या भव्य आशयाच्या कवेंत मी गवसलों आहें त्याच्या पकडींतून अद्याप तरी मी मुक्त झालेलों नाही. ' देवांचं मनोराज्य ' लिहीत असतांना त्याच आशयांतून उमटलेल्या ज्या अन्य दोन नाटकांचे संकल्प मी माझ्या मनाशीं सोडले, ते पुरे झाल्यावर कदाचित् माझ्याच कृतीचें मूल्यमापन मला करतां येईल; पण त्यामुळेच या कलाकृतीचा अलिप्तपणें परामर्श घेणें आजच्या घटकेला तरी मला शक्य नाही याबद्दल रसिकांनी मला क्षमा करावी. मात्र मतमतांतराच्या गलबल्यांत मला प्रतीत झालेलें एक सत्य आपल्यापुढे मांडून मी हें परीक्षण संपविणार आहें. लोकप्रियतेच्या मापानें मोजल्यास ' देवांचं मनोराज्य ' या नाटकाचें अपयश कोणाच्याहि डोळ्यांत भरण्यासारखें आहे. ' वेड्याचं घर उन्हांत 'ला मिळालेल्या असाधारण यशाच्या तुलनेने तर जास्तच. तथापि या अपयशाची ' जात ' आणि ' पातळी ' सामान्य नाटकांच्या पडेलपणापेक्षा फार वेगळी आहे असा इशारा समीक्षकाच्या भूमिकेवरून देणें मला जरूर वाटतें; आणि याच भूमिकेवरून असेंहि सांगावेसें वाटतें की, एका वसंत कानेटकरांची लेखनशक्ति तोकडी पडल्यामुळें जरी हें अपयश निर्माण झालें असलें, तरी ' देवांचं मनोराज्य ' च्या ' महान् अपयशांतच ' ( Grand Failure ) उद्याच्या प्रतिभासंपन्न नाटककारांच्या विचारप्रवर्तक नाटकांची उषःकाल आहे. ● ● ●

व. दि. कुलकर्णी

# टीकावाङ्मय

'ज्यांच्यांत मतभेद नाहीत ते कसले टीकाकार?' असें म्हटलें जातें; पण त्यांच्यांतहि मतैक्य व्हावें असें कांही बादातीत असूं शकतें हें गेल्या वर्षातील मराठी टीकावाङ्मयाने दाखवून दिलें आहे. मराठी भाषिक प्रांतांत जीं जिल्हा, प्रांतिक किंवा नागर साहित्यसंमेलनें भरलीं तेथील अध्यक्षीय पदांवरून केलेलीं भाषणें अभ्यासिलीं की हा नवचमत्कार आपणांस चटकन जाणवूं लागतो. 'मर्ढेकरांचें सौंदर्यशास्त्र हें अपुरें आहे आणि साहित्याचें यथार्थ मापन जर करावयाचें असेल आणि त्यांच्यांत तरतमभाव ठरवावयाचा असेल तर आणखी वेगळ्या जीवननिष्ठ मूल्यांची कसोटी लावावयास पाहिजे' असा गतवर्षीच्या टीकावाङ्मयाचा निस्संदिग्ध निष्कर्ष आहे. शिवाय आजचें मराठी ललितसाहित्य हें अण्वाश्रित, अल्पप्राण, विकासशून्य आणि साचेबंद झालें आहे; त्यांत प्रगल्भ मनाचा आविष्कार होत नाही याची या टीकाकारांना इतकी तीव्र जाणीव झाली आहे की त्यांचे तेच महाकाव्याकडे वळले आहेत. भव्य आणि विशाल वास्तवाचें सामग्र्यानें घेतलेलें दर्शन ललितवाङ्मयांतून घडावें ही मराठी मनाची आजची भूक आहे हेंहि त्यांतून प्रभावीपणें प्रकट झालें आहे. पूर्वसंकेत किंवा पूर्व-योजना आखून हें घडलें गेलें असें आपणांस म्हणतां येणार नाही. आजच्या मराठी साहित्याची व समीक्षाशास्त्राची प्रकृतीच त्यांना आपलें निदान करावयास लावीत होती असें दिसतें. हे टीकाकार केवळ एकगोत्रीय आहेत असेंहि नाही. विनोबासारखे अन्यक्षेत्रीय (?) द्रष्टे पुरुष, अनिल–बोरकरांसारखे जुन्यानव्या श्रद्धांतून सत्त्व व सौंदर्य निर्माण करणारे चिंतनशील कलावन्त, प्रा. श्री. के. क्षीरसागरांसारखे सौंदर्यवादी वृत्तीचे रसिक, चोखंदळ टीकाकार, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांसारखे अभिनिवेशी पण सप्रमाण लेखन करणारे विद्वान्, याउलट अनाग्रही भूमिका स्वीकारणाऱ्या व्यासंगी समीक्षिका प्रा. कुसुमावती देशपांडे यांसारख्या अधिकारी व्यक्तींनी जबाबदारीच्या स्थानांवरून हा निर्वाळा दिलेला आहे. फार काय नव-साहित्याची पाठराखणी करणारे व जिज्ञासु मनाने त्यांतील सौंदर्यास्वाद घेणारे प्रा. वा. ल. कुळकर्णी देखील या मेळाव्यांत वावरतांना दिसतात. यामुळे या एकवाक्यतेचें सामर्थ्य अनेक पटींनी वाढलें आहे. तिचा योग्य तो परामर्श कलावन्त आणि रसिक यांनी घेणें अत्यंत आवश्यक आहे.

कला ही पूर्णपणें स्वतंत्र आहे, तिचें प्रयोजन तिच्या प्रकृतीनेच सिद्ध केलेलें असतें, सौंदर्य (?) हेंच तिचें अंतर्बाह्य मूलतत्त्व, त्याहून इतर कोणतेंहि मूल्य हें कलाबाह्य; त्यामुळें समीक्षकांचें कार्य ललितकृतींत भावनात्मक लयांची केंद्रपूर्ण आकृति पाहणें, तिचा थाट व अंतर्गत सुसंगति, त्या सुसंगतीचे नियम व तत्त्वें, तिच्यांतील प्रतिमानांचें स्वरूप, त्यांच्या परस्परसंबंधांतून निर्माण होणारे आकृतिबंध पाहणें एवढेंच ठरलें. यापेक्षा अधिक कांही पाहणें म्हणजे कलेवर जुलूम करणें होय. ही जी मतप्रणाली आहे तिचा परामर्श घेतांना प्रा. कुसुमावती देशपांडे[१] यांनी

१. मुंबई व उपनगर साहित्यसंमेलन, गोरेगांव, १९५८. अध्यक्षीय भाषण.

तीमधील दोष व संभाव्य धोके स्पष्ट केले आहेत. या रीतीने होणारी समीक्षा पुष्कळ अंशीं रचनानिष्ठ किंवा रचनाविषयक प्रश्नांनी सीमित होण्याचा संभव असतो असें त्या म्हणतात. शिवाय साहित्यकृतींविषयींच्या तरतमभावाचा प्रश्न या सौंदर्यशास्त्राने सुटत नाही. सौंदर्यापुढे तरतमभावच उरत नाही हें म्हणणें ठीक असलें, तरी तरतमभावाची मीमांसा करणें हें समीक्षेचें आवश्यक कार्य असल्यामुळे, वाङ्मयीन समीक्षेला सौंदर्यकल्पनेच्या व्यतिरिक्त जीवनमूल्या-कडे वळणें प्राप्त होतें. समीक्षेच्या प्रक्रियेंत सौंदर्यमूल्याला स्थान नाही असें त्यांचें म्हणणें नाही. उलट सौंदर्यमूल्याला पहिलें मानाचें स्थान आहे. कलेचें ' कलात्व ' याच मूल्याने निश्चित करावयाचें असतें. पण ' सौंदर्य ' हेंच एकमेव मूल्य नव्हे. नाही तर बालकवींची एखादी कविता आणि वाल्मीकिरामायण यांच्यामध्ये फरक काय, तें स्पष्ट करतां येणारच नाही. एका समर्पक दृष्टान्ताने त्यांनी हा मुद्दा चांगलाच मनावर ठसविला आहे. दंवबिंदूचा थाट स्वयंपूर्ण आणि सुंदर असतो. तो गंगौघापेक्षा कमी सुंदर असें कोणीहि म्हणणार नाही. पण गंगेची गतिमानता, तिची झेप आणि विशालता यांची थोरवी जाणून दंवबिंदु आणि गंगा यांच्यांतील तरतमभावाची मीमांसा करण्याचें टाळणें म्हणजे केवळ दुराग्रह होय. शिवाय गंगेच्या केवळ निर्देशाने तिच्याशीं निगडित असलेल्या युगायुगाच्या भावनांचे संस्कार मनांत उभे राहतात. त्यांच्या मापनाला सौंदर्याचें मूल्य कसें वापरतां येईल? यासाठी समीक्षेचा मानदंड आपल्या कार्यासाठी पूर्णपणें समर्थ व्हावा, समीक्षापद्धति सर्वाश्लेषी व्हावी म्हणून सौंदर्यशास्त्रीय मूल्यां-बरोबर जीवनमूल्यांचाहि त्यांत अंतर्भाव केला पाहिजे, अशी प्रा. कुसुमावती देशपांडे यांची भूमिका आहे.[२]

या नवसमीक्षाशास्त्राला कवि अनिल[3] ' व्याजशास्त्र ' ( स्यूडो सायन्स ) असें संबोधितात. कारण त्यांत परिभाषेची निश्चिति नाही, वस्तूची व्याख्या नाही, तर्काचा केलेला आश्रय आभासात्मक आहे, अहंप्रत्ययात्मक विधाने दडपलेलीं आहेत इत्यादि अशास्त्रीयता त्यांना जाणवते. पण यापेक्षाहि अनिलांचा खरा आक्षेप गायन, वादन, नृत्य, वास्तु, शिल्प व चित्र यांच्या दावणीला ' काव्य ' या कलेस बांधलें यावर आहे. कारण काव्येतर ललितकलांचा आनंद इंद्रियसंवेदनाजन्य असतो, आणि काव्यानंद हा मनोग्राह्य असतो. मन हें ज्ञानेंद्रियाचें ज्ञानेंद्रिय असल्याने काव्य ही सकल कलांची कला होय. त्यांत केवळ ज्ञानेंद्रियांच्या द्वारें मनावर भावनात्मक परिणाम करणाऱ्या थाटाला, संयोजनेला, सन्नि-पाताला, रूपाला किंवा आकृतीला केवळ महत्त्व नसतें; तर अर्थाला, आशयाला महत्त्व असतें. ' आकृतिवाद ' हा 'आशय-वादा'ची भंवेरी उडवूं शकत नाही.[४] केवळ ' सौंदर्य ' या समान तत्त्वावर ' काव्यकला ' इतर कलांशीं सजातीय ठरवितां येत नाही, असें त्यांचें ठाम मत आहे.

---

२. मर्ढेकरांनाहि ' सुंदर ' आणि ' श्रेष्ठ ' यांतील भेद अभिप्रेत होता असें त्यांच्या ' वाङ्मयीन महात्मता ' या ग्रंथांतील अखेरच्या भागावरून म्हणतां येतें.

३. म. सा. संमेलन, मालवण, १९५८. अध्यक्षीय भाषण. या भाषणांत महाराष्ट्र-धर्म, मराठी साहित्याचें आजचें प्रयोजन, प्रतिभावंतासंबंधीं भारतीय अपेक्षा, आजच्या प्रतिभावंतांची अव्यवस्थित प्रज्ञा, साहित्यांतील दुर्बोधता !

४. हाच विचार विदर्भ साहित्य संमेलन, यवतमाळ, १९५८, येथील अध्यक्षीय भाषणांतून कवि अनिल यांनी पुन्हा मांडला आहे.

श्री. ग. त्र्यं. माडखोलकरहि[5] या आकृति-वादाशीं सहमत नाहीत. लयबद्ध रचना, समतोल, विरोध, पूरकतोल इत्यादींचें गणित मांडण्याचा प्रयत्न म्हणजे अभिरुचि संख्याबद्ध करण्याचा प्रयत्न होय. त्याने काव्यांतील रसास्वाद घेतां येणार नाही. साहित्यांत अभिरुचिनिष्ठता व अनुमाननिष्ठता यांना अनिर्बंध वाव असला पाहिजे. त्यांचें गणितीं मापन नको, असें माडखोलकरांच्या विचाराचें सार आहे.[6]

तर मग खरें सत्य आणि सौंदर्य कशाने निर्माण होतें ? याचा विचार विनोबा भावे यांनी मांडला आहे. साहित्यांत सत्य व सौंदर्य एकजीवित्वाने आविष्कृत होतात. पण सौंदर्य हें समग्रतेशिवाय असूं शकत नाही. समग्रता थोडी जरी कमी पडली तरी तें सौंदर्य 'सुंदर' होणार नाही. नाक कापून अलग ठेवलें तर तें सुंदर वाटणार नाही. तें त्या सकलांग देहाचें एक सौंदर्य वाढविणारें अंग आहे या नात्यानें राहील तरच तें सुंदर दिसेल. म्हणून संपूर्ण सत्याचा जे शोध करतात त्यांनाच सौंदर्य कुठे कुठे लपलें आहे तें कळतें; म्हणून जेवढी **जीवनाची समग्रता**[7] लक्षांत येईल तितकें खोल सौंदर्य प्रकट होईल व त्यालाच साहित्य ही पदवी लाभेल. याचें उदाहरण म्हणून विनोबा रामायणाकडे बोट दाखवितात. 'साहित्य म्हणजे तमाम सर्वांच्या सहित जें जाईल' असें साहित्याचें लक्षण मानून रामायण हें सगळ्यांना आपल्याबरोबर निरंतर असावें असें वाटतें एवढ्याचसाठी तें साहित्य आहे असें विनोबा प्रतिपादन करतात. आज भारतांतून रामकथा जर काढून घेतली तर भारताचा आत्मा तडफडेल. साहित्य हें तरुणपणीं, म्हातारपणीं आणि अंतसमयींहि गोड वाटलें पाहिजे. हा अवीट, अक्षय्य आणि अविच्छिन्न आनंद देण्याची ताकद समग्र जीवनदर्शनांतून स्फुरणाऱ्या सत्य व सौंदर्य यांच्या एकजीव आविष्कारांत म्हणजेच महाकाव्यांत—आहे असा विनोबांचा दृष्टिकोन आहे.

"आजचें मराठी वाङ्मय हें अवास्तव, काल्पनिक आहे, आजच्या कलावंतांना वास्तवाची अभिरुचि नाही असा आक्षेप घेऊन डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे[8] यांनी आपले विचार मांडले आहेत. वास्तववाद हा एका जीवनविषयक तत्त्वज्ञानांतून निर्माण होत असतो. पण मानवी जीवनाचें सम्यक् आकलन झालेलें असेल तरच या तत्त्वज्ञानाची अभिरुचि माणसाच्या ठायीं निर्माण होते. रागलोभादि विकार, विविध तत्त्वज्ञानें आणि व्यक्तिगत आंतरिक प्रवृत्ति मानवाला कशा खेळवितात याचा डोळस व सूक्ष्म अभ्यास साहित्यिकाला आवश्यक आहे. टिळक, वॉशिंग्टन, चर्चिल या नेत्यांना मानवसमाजाचें ज्ञान जितकें आवश्यक आहे तितकेंच **वास्तववादी महाकाव्य**[9] निर्माण करणाऱ्या कवीलाहि तें आवश्यक आहे. हा दृष्टिकोन विनोबांच्या दृष्टिकोनाशीं सरळ जुळता-मिळता आहे.

प्रा. श्री. के. क्षीरसागर[10] 'अक्षरवाङ्मया'चा विचार करतांना 'पण लक्षांत कोण घेतो ?', 'भाऊसाहेबांची बखर', 'मेघदूत', 'हॅम्लेट', 'मॅक्बेथ' या ललितकृति खुल्या दिलाने अक्षरवाङ्मयांत समाविष्ट करून घेतात. पण हळूहळू त्या ओलांडून अखेर महाकाव्यापुढे मात्र निश्चलपणें उभे राहतांना दिसतात. रामायण-महाभारत हीं काव्यें त्यांना सर्वार्थानी

५. महाराष्ट्र साहित्य सभा, शारदोत्सव, इंदूर, १९५८ – 'अध्यक्षीय भाषण.'

६. 'वाइल्ले यांचा कलाविचार' (छंद, सप्टें-ऑक्टो. १९५८) या लेखांत प्रा. म. पुं. रेगे यांनीं मर्ढेकरांच्या मूल्यमापन-पद्धतींत अपरिहार्यपणें येणाऱ्या कलाकृतीच्या रूपांच्या गणिती आराखड्याचा उल्लेख केला आहेच.

७, ९. जाड टाइप माझे. ८. 'वास्तवाची अभिरुचि'–'हंस' दिवाळी अंक, १९५८.

१०. 'सामान्य वाचकाचा टीकाविवेक'–लेखांक ८११ 'सुदर्शन' मधून प्रकाशित.

' अक्षर ' वाटतात. या वाङ्मयांत लेखकाची अलिप्त वृत्ति ( Objectivity ); वाचकाच्या अनुभवास येणारी चित्रणाची शान्त, तृप्त व निर्वृत मुद्रा ( Repose ); संपूर्ण मानवी जीवित व त्यांतून कानीं पडणारे भवितव्यतेचे गूढ इशारे—त्या विशाल विषयाची निवड; चित्रणांतील अढळ संयम; आणि उदात्त, अतिमानुष मूल्येंहि निर्भयपणें उद्घोषित करण्याचें प्रज्ञासामर्थ्य व धैर्य या पांच आकर्षणहेतूंचा आढळ होतो. यामुळेच प्रा. श्री. के. क्षीरसागर यांना उत्तररामचरित, शाकुंतल, हॅम्लेट यांहून रामायण, महाभारत, ओडेसी श्रेष्ठ वाटतात.

आर्ष कवींच्या अनिर्बंध रचनेविषयी आणि महात्मतेविषयी बोलत असतां श्री. ग. त्र्यं. माडखोलकर[११] रामायण–महाभारतादि पुराणकाव्यांतून व्यक्त होणाऱ्या तत्कालीन समग्र व विराट् जीवनदर्शनालाच अग्रस्थान देतात. प्राचीन आर्ष ऋषींची भूमिकाच मुळी अखिल मानव्याचा इतिहास जसा त्यांना दिसला, जाणवला आणि समजला तसा लोकांपुढे उभा करण्याची होती. त्यामुळे श्लील–अश्लील, सुष्टदुष्ट, शुभाशुभ इ० मर्यादांचा विवेक काटेकोरपणाने करणें त्यांना शक्य नव्हतें. आर्ष कवींच्या मानाने प्राचीन अभिजात कवींची ( कालिदासादींची ) रचना ही रूप आणि आशय या दोन्ही दृष्टींनी साचेबंद आणि संकुचित आहे. कारण अभिजात कवींची रचना ही साहित्यशास्त्रलेखनोत्तर काळांतील, त्या नियमांनुसार झालेली आहे. यामुळे कवींचीं महाकाव्यें, नाटकें, कथा, चम्पू या गद्य-पद्यादि प्रबंधांत विलक्षण कारागिरी व कृत्रिमता आली. म्हणून हीं विदग्ध महाकाव्यें सुंदर असूनहि, असामान्य असूनहि आर्ष महाकाव्यांपुढे श्रेष्ठ वाटत नाहीत. साहित्यसमीक्षेत मूल्यमापनाचें महत्त्व काय आहे तें या विवेचनावरून सहज लक्षांत येईल. श्री. ग त्र्यं. माडखोलकर साहित्यिकाला सर्व दार्शनिकांचा दार्शनिक समजतात. कारण या साहित्यकाराच्या साहित्याचें प्रयोजन त्यांच्या मतें, म्हणजे आपल्या स्वतःच्या उद्बुद्ध अस्मितेच्या प्रभावी आविष्काराने रसिकाच्या अस्मितेचें उद्बोधन करून त्याला नवी स्फूर्ति व प्रेरणा देणें हें आहे. यामुळे ललितवाङ्मयापासून माडखोलकर हे कालपक्व आणि गतार्थ ठरलेला पाश्चात्य जडवाद आणि भारतीय तत्त्वज्ञानांतील जुनाट मूल्यें टाकल्यानंतर त्यांच्या जागीं नवीं आध्यात्मिक मूल्यें स्थापन करून त्या मूल्यांच्या पायावर नव्या संस्कृतीची उभारणी करण्याच्या महाकार्याची अपेक्षा करतात.

कलात्मक सचोटी असेल तर काव्याचें कार्य तेथेंच खरोखर संपतें हें तत्त्व मराठी काव्याच्या जन्महेतूशींच कसें बेइमानी करतें तें कविवर्य बा. भ. बोरकर[१२] यांनी मोठ्या पोटतिडिकीने दाखवून दिलें आहे. संस्कृतीच्या कडीकुलपांत अडकून पडलेलें व मूठभर शिष्टांची मिरास बनलेलें अनुभव-भांडार पोरांसोरांकडून, बायाबापड्यांकडून व कष्टी कुळवाड्यांकडून लुटविण्यासाठी आम्हां मराठ्यांची ही **अक्षरभवानी**[१३] प्रकट झाली. आज तिच्या मंदिरांत इंग्रजी टीकाशास्त्राच्या अर्ध्या हळकुंडाने पिवळ्या झालेल्या आणि खऱ्या भक्तीचा जातिवंत जिव्हाळा नसलेल्या छोट्या-मोठ्या भुत्यांनी आपल्या या आईची मिरासदारी बळकाविली आहे.

११. महाराष्ट्र साहित्यसभा, शारदोत्सव, इंदूर, १९५८–अध्यक्षीय भाषण–या भाषणांत 'साहित्य हा मानवी अस्मितेचा अत्युच्च आविष्कार आहे...या अस्मितेंतून लोकजीवनाचें समग्र दर्शन घेणारा, मानव्याचा खरा द्रष्टा कवि एकनाथाखेरीज दुसरा कोणी झालाच नाहीं' हा विचार मांडला आहे. वरील संदर्भांत याचाहि विचार होणें आवश्यक आहे.

१२. कविसंमेलन, सोलापूर–१९५८–अध्यक्षीय भाषण.

१३. जाड दाङ्प माझा.

साहित्यक्षेत्रांतील अधिकार आजचे **अंगुष्ठमात्र वालखिल्य**[१४] यांच्या हातीं गेले आहेत. व्यास-वाल्मीकींचें अंगुष्ठमात्र दर्शनहि आज होत नाही असें तळमळून बोलतांना बोरकर दिसतात. अस्सल काव्य हा कांही लौकिक चातुर्योद्गार नव्हे की केवळ उत्कट भावोद्गारहि नव्हे; तो एक उत्कट मंत्रोद्गार आहे—भारलेला तसाच भारणारा. सारें जीवन ज्या वेळीं भोवऱ्यांत सापडतें त्या वेळीं हें अस्सल काव्य उत्तुंग दीपस्तंभाप्रमाणे निर्भयपणें खडें असतें आणि साऱ्या काल-प्रवाहावर आपल्या शुभंकर प्रकाशाची ढाल टाकीत असतें. जग जेव्हा घाबरलेलें असतें तेव्हा तें स्वतः निर्भय असतें. जेव्हा असें काव्य, म्हणजेच खऱ्या विश्वव्यापक अंतःसंगीताचा साक्षात्कार, लोकवाणींतून साकार होईल तेव्हाच तें अवघा संसार सुखाचा करील. कविवर्य बोरकर यांच्या श्रद्धा अशा काव्यमय शब्दांतून प्रकट झाल्या आहेत.

विनोबा भावे यांचा साहित्यक्षेत्रांतला अधिकार अमान्य करणारे कांही रसिक असूं शकतील. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे व प्रा. श्री. के. क्षीरसागर यांना 'अभिनिवेशी', 'जुने' अशा विशेषणांनी दूर टेवण्याचा परिपाठ कोणी स्वीकारतील, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांनी कलेवर प्रयोजनाचा पाषाण ठेवण्याचा गुन्हा केला आहे असें कांही मानतील, तर श्री. बा. भ. बोरकर यांच्या वाणींत 'केवळ कवित्व' आहे म्हणून तिची उपेक्षाहि बरेचजण करतील. 'हे सर्व असेंच बोलणार हें आम्हांस टाऊक आहे' या एका वाक्याने सर्वांची एकदम बोळवण करण्याची उदार विनोदबुद्धि दाखविण्याचा मोह तर बहुतेकांना होईलच. अशांच्यासाठी खास आजचे व आजच्या साहित्यिकांना मान्य असलेले टीकाकार प्रा. वा. ल. कुलकर्णी यांचा हवाला देतां येईल. प्रा. वा. ल. कुलकर्णी यांनी मालवण येथील मराठी साहित्य संमेलनाच्या कथाशाखेच्या अध्यक्षपदावरुन जें भाषण केलें त्यामुळे नवसाहित्यिकांनाच एक प्रकारचा हादरा बसला आहे. सौम्य, सौम्यतर शब्दांतून सत्य प्रकट केलें तरी मिरच्या झोंबतात हें त्यावर झालेल्या प्रतिटीकात्मक लेखांतून स्पष्ट होतें. "आज मराठी लघुकथा-लेखनामागील प्रेरणा व वृत्ति, मराठी लघुकथेचे कुतूहलविषय, तिचा आशय व त्याची अभि-व्यक्ति ह्या बाबतींत तोचतोपणा जाणवूं लागला आहे; तिच्यांत सांकेतिकता जाणवूं लागली आहे आणि ह्याचें कारण मुख्यत्वेकरुन आम्ही लघुकथेच्या एकंदर स्वरूपाविषयी व कार्या-विषयी करून घेतलेली संकुचित कल्पना व त्या कल्पनेच्या आहारीं जाण्याची वाढती प्रवृत्ति हेंच होय." हें सत्य प्रांजळपणें मांडल्याने प्रा. वा. ल. कुळकर्णी यांचे खरोखरी आभार मानावयास हवेत. मराठी रसिकांना तपशिलांत शिरून तत्त्व मिळणाऱ्या कथा नकोत, केवळ नव्या पायवाटांनी जाणाऱ्या कथाहि नकोत, तर नव्याजुन्या पायवाटांनी जाणाऱ्या नवसौंदर्य-संपन्न आणि जीवनसामर्थ्ययुक्त कथा हव्या आहेत. आज कथेचा विकास होत नसून केवळ विस्तार होत आहे हेंहि प्रा. वा. ल. कुलकर्णी सांगून मोकळे झाले आहेत.[१५]

यापेक्षाहि आजकालच्या मराठी कादंबरीचा[१६] परामर्श घेतांना पेंडसे, माडगूळकर

१४. जाड टाइप माझा.

१५. वसंत व्याख्यानमाला, पुणें, १९५७ मध्ये श्री. पु. भा. भावे यांनी 'नवकथा आता अगदी सडून गेली आहे......ती एक मृत गोष्ट झाली आहे' असे विचार मांडले होते. त्यांतील भाषेचा भडकपणा वजा जातां मुख्य 'प्रमेय' वरीलपेक्षां तत्त्वतः वेगळें आहे, असें वाटत नाही. श्री. पु. भा. भावे यांची 'शापवाणी' वाटते, तर प्रा. वा. ल. कु. यांची त्यावरील 'उश्शाप वाणी' वाटते.

१६. 'मराठी कादंबरी–काल आणि आज'— प्रा. वा. ल. कुलकर्णी. 'केसरी,' दिवाळी अंक १९५८

इत्यादींच्या प्रयत्नांनी मराठी कादंबरीचा एका मर्यादेपर्यंत कलार्थानें निस्संशय फायदा झाला आहे हें मान्य करूनहि आजच्या मराठी कादंबरीवर प्रा. वा. ल. कुलकर्णी संतुष्ट झालेले नाहीत. ज्या आत्मचरित्रात्मक प्रेरणांतून आजच्या मराठी कादंबरींत जिवंतपणा आला आहे, त्या प्रेरणा तारुण्याच्या उंबरठ्यापर्यंतच्या अनुभवांतिल्या आहेत. त्यामुळे हे अनुभव तितकेसे भावगर्भ होऊं शकत नाहीत. जीवनाच्या खोल सत्यावर नेमकें बोट ठेवण्याची कुवत प्रौढ कलात्म मनांतच असते. ही प्रौढ प्रतिभा केवळ आत्मचरित्रांतून लेखनाला प्रेरणा घेईल असें प्रा. वा. ल. कुलकर्णी यांना वाटत नाही. हरिभाऊंच्या व वामनरावांच्या कादंबऱ्यांत कलादोष दिसत असले तरी त्या कादंबऱ्या आपली एक वेगळीच आंतरिक भूक भागवीत असतात. ही भूक भागल्याशिवाय आपलें खरें समाधान होत नाही. आजची मराठी कादंबरी कलादृष्ट्या कितिहि सुंदर व जिवंत असली तरी हें समाधान देत नाही–असें जेव्हा प्रा. वा. ल. कुलकर्णी म्हणतात तेव्हा आशयघनतेला त्यांनी दिलेलें श्रेष्ठत्व सहज ध्यानांत येण्यासारखें आहे.[१७] त्यांना पेंडसे व माडगूळकर हवे आहेत पण त्यांची प्रतिभा प्रौढ व प्रगल्भ होणें त्याहूनहि अधिक हवें आहे असाच यांतून निष्कर्ष निघत नाही काय ?

प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनी ह्या 'नवकथा-पूजकांच्या[१८] नवपवित्र्याकडे' मोठ्या मर्मभेदक उपहासाने पाहिलें आहे. अर्थात् हें केवळ सलामीदाखल लेखाच्या प्रारंभीं येऊन जातें. नंतर मात्र आजच्या मराठी कथेने जागतिक अर्वाचीन कथेचे जे दोन प्रवाह आहेत त्यांपैकी एकाचेंहि सौंदर्य व सामर्थ्य कसें पचविलें नाही तें दाखविलें आहे. रवीन्द्रनाथ, शरद्‌बाबू, टॉलस्टॉय, अलेक्झँडर, क्यूप्रिन् यांच्या अंतःकरणांतील पुनीतकारी करुणा, आणि उघडें-नागडें मानवी मन रंगविल्याविना बेचैन होणारा, पण मानवी मन आहे त्याहून अधिक प्रामाणिक असतें तर आनंद मानणारा मोपासाँ याची सत्त्वसंपन्न वास्तवदृष्टि यांपैकी कांहीच नवकथाकारांच्या ठायीं नाही. आडरानांत प्रवास करणाऱ्या मराठी कथेमागील अनुभूति, प्रेरणा व प्रवृत्ति क्षुद्र आणि विकृत आहेत, 'कथे'संबंधींच्या मूळ कल्पनाच चुकीच्या आहेत अशा शब्दांत प्रा. श्री. के. क्षीरसागर आपलें मत मांडतात. कथा म्हणजे काय, कथेची आधुनिकता अथवा नावीन्य म्हणजे काय हें स्पष्ट करण्यासाठी 'काबुलीवाला' या लेखन-कलादृष्ट्या जुन्या कथेचें मोठें मार्मिक रसग्रहण व मूल्यमापन करून त्यांतील आशय सदैव नवीन कसा आहे हें त्यांनी दाखवून दिलें आहे; इतकेंच नव्हे तर, हा आशय उदात्त आणि सर्वस्पर्शी असल्याने 'काबुलीवाला' ही कथा केवळ नवीन व सुंदर नसून 'श्रेष्ठ' आहे, इतकी श्रेष्ठ की इतक्या साध्या, इतक्या वास्तव घटनांनी एवढें विशाल अनुभवविश्व उभी करणारी दुसरी कथा दाखविणें प्रा. क्षीरसागर यांना कठीण वाटतें.

या सर्वांतून पुढील निष्कर्ष[१९] ओघानेच निघतो की, साहित्याचें यथार्थ मूल्यमापन करणें

१७. प्रा. वा. ल. कुलकर्णी हे प्रथमपासूनच खरोखरी प्रगल्भ, प्रौढ प्रतिभेचे पूजक आहेत हें त्यांच्या 'वामन मल्हार-वाङ्मयदर्शन' या ग्रंथाचें पहिलें प्रकरण चाळणाऱ्यांच्या सहज लक्षांत येईल.

१८. 'नवकथापूजकांचा नवा पवित्रा'–प्रा. श्री. के. क्षीरसागर, 'अञ्जलि' दिवाळी अंक, १९५८.

१९. एका वर्षांतल्या टीकेवरून असा सिद्धान्त बांधणें बरोबर आहे काय ? ही शंका व्यक्त करण्यांत आली आहे, येईलहि. पण 'विगमन पद्धती'ने विवेचन केलेलें आहे यांतच याचें उत्तर सापडेल. तसेंच या लेखांत निर्देशिलेल्या टीकाकारांचीं सर्वच मतें व विचार मला जसेच्या तसे मान्य आहेत असें नाही. निष्कर्ष मात्र मला मान्य आहे.

हें साहित्यसमीक्षेचें आवश्यक कार्य आहे. तें यथोचित पार पाडावयाचें असेल तर केवळ सौंदर्यशास्त्रावर विसंबून चालणार नाही. सौंदर्यशास्त्र कलेचें 'कलापण' निश्चित करील, पण तिची श्रेष्ठता अजमावण्यासाठी जीवननिष्ठ मूल्यांचा आश्रय करणें समीक्षाशास्त्राला भाग आहे. तसेंच केवळ सौंदर्यशास्त्रांतील कलास्वातंत्र्य, आत्मनिष्ठा ( sincerity ) इ० तत्त्वांवर विसंबून निर्माण होणारी कला जिवंत व सुंदर असली तरी ती अल्पप्राण, संकुचित जीवनार्थ देणारी ठरते. यामुळे मनाची श्रेष्ठ आंतरिक भूक भागत नाही; त्यासाठी प्रगल्भ व प्रौढ प्रतिभेने समग्र वास्तवाच्या साक्षात्कारांतून प्रेरणा घेऊन लेखन करणें आवश्यक आहे. आज मराठी साहित्यांत दंवबिंदूंचीच निपज होत असलेली पाहून प्रतिक्रिया म्हणून (?) गंगौघाची—महाकाव्य-सदृशरचनेची—अपेक्षा टीकाकार करीत आहेत. आजची कथा, काव्य, कादंबरी एका सांकेतिक आवर्तांत भ्रमण करीत आहेत, म्हणजेच ज्यासाठी तिने जन्म घेतला तें तिचें अवतारकार्य संपलें आहे; नवसंप्रदाय चिघळूं लागला आहे.

अर्थात् मर्ढेकरप्रणीत सौंदर्यशास्त्राविरुद्ध होत असलेल्या ह्या प्रतिक्रियेचें स्वागत करतांना, मर्ढेकरांनी मराठींत होणाऱ्या वाङ्मयाच्या मूल्यमापनांत पूर्वी नेमकेपणाचा जो अभाव होता, त्याला आळा घालण्याचा जो प्रयत्न केला त्याचें महत्त्व विसरून चालणार नाही. मर्ढेकरपूर्व-कालीन टीकापद्धति व मर्ढेकरोत्तरकालीन टीकापद्धति या दृष्टीने तोलून पाहण्यासारखी आहे. तसेंच मराठी ललितलेखनांत घुसलेला पोशाखीपणा, खोटेपणा, दुबळा भूतदयावाद किंवा कल्पनारंजित ध्येयवाद इत्यादि कलेचें कलारूपच बिघडवून टाकणाऱ्या गोष्टींचा निचरा मर्ढे-करांच्या सौंदर्यशास्त्राने प्रभावाने घडवून आणला आहे. कलेला शुद्ध कलारूप देणें हें सर्वप्रथम व अत्यंत महत्त्वाचें कार्य आता सिद्धीस गेलें आहे, म्हणूनच श्रेष्ठतर मूल्याची तृषा आज आपणांस लागली आहे. 'कलेची[20] सजीवता' मान्य करून, त्या दृष्टीने कलेचें[21] परीक्षण करून आज आपण उच्चतर आशयाची, जीवनदर्शनाची अपेक्षा करीत आहों, हें सदैव मनांत बाळगलें पाहिजे.

आतापर्यंत स्फुटलेखांतून व्यक्त झालेल्या आजकालच्या मराठी साहित्यविषयक आणि साहित्यशास्त्रपर विचारांचा अल्प परामर्श घेण्यांत आला. हें सर्व टीकालेखन पाश्चात्त्य साहित्य-शास्त्राच्या आधारें करण्यांत आलें आहे हें सांगण्याचें कारण नाही. आजचें मराठी टीकाशास्त्र हें सर्वस्वी परकीय–अभारतीय आहे असें सत्याची चाड ठेवावयाची असेल तर स्वाभिमानी महाराष्ट्रियालाहि कबूल करावें लागेल. फार काय संस्कृत साहित्यशास्त्र हा उपेक्षा आणि अनास्था यांचा विषय झाला आहे. या शास्त्राला नांवें ठेवण्याचा शिष्टाचार (?) आज पडला आहे. अशा वेळीं प्रा. ग. त्र्यं. देशपांडे यांचा 'भारतीय साहित्यशास्त्र' हा श्रेष्ठ ग्रंथ प्रकाशांत येत आहे. मराठी साहित्याचा जन्म संस्कृत साहित्यांतून जसा झाला तसा

---

२०. 'कलेचें जीवशास्त्र' – ले. व्लाडिमीर वाइड्ले ('छंद', जुलै–ऑगस्ट १९५८). अनुवाद–प्रा. वा. ल. कुलकर्णी.
प्रा. मे. पुं. रेगे.

२१. श्री. दिलीप चित्रे आणि श्री. माधव आचवल यांच्या 'सत्यकथे'तून प्रसिद्ध झालेल्या टीकालेखांतून कवितेचें यंदा तिने निर्माण केलेल्या 'अस्तित्वावस्थे'च्या अनन्यसाधारणत्वाच्या प्रतीतीवरून जाणून घेण्याची जी प्रवृत्ति दिसते, ती मूळ काव्यवस्तूचा निर्मळ मनाने शोध करणारी व आस्वाद घेणारी आहे. पण यांत आकलन व आस्वाद या अवस्थेपर्यंतच रसिकमन पोहोचलेलें दिसतें.

मराठी साहित्यशास्त्राचा जन्महि संस्कृत साहित्यशास्त्रांतून झाला आहे. यामुळे मराठी साहित्य-शास्त्राचा अभ्यास व त्यावरील विचार संस्कृत साहित्यशास्त्राच्या सखोल आणि मूलग्रामी अभ्यासाविना पूर्णावस्थेस पोहोचूं शकत नाहीत.

आजवर ' अभिनव काव्य–प्रकाश ', ' काव्यालोचन ', ' रसविमर्श ', 'साहित्यमीमांसा' इ० संस्कृत साहित्य–शास्त्राची अभिनव ओळख करून देणाऱ्या इंग्रजी-मराठी साहित्यशास्त्राचा संबंध-समन्वय घडवूं पाहणाऱ्या मराठी ग्रंथांपेक्षा या ग्रंथाचें स्वरूप अगदी वेगळें आहे. या ग्रंथाच्या पहिल्या भागांत संस्कृत साहित्यशास्त्राचा विकास कसा झाला याचें ऐतिहासिक दृष्ट्या विवेचन केलें आहे. यांत भरतकाल, भरत ते भामह, भामह ते रुद्र, आनंदवर्धन ते मम्मट आणि मम्मट ते जगन्नाथ असे पांच विकासाचे टप्पे पडतात. त्यांत अनुक्रमें क्रियाकल्पावस्था, काव्यलक्षण, काव्यालंकार, साहित्य आणि साहित्यपद्धति असा काव्यशास्त्रस्वरूपाचा अनुक्रम दिसतो. भरताचें ' नाट्यशास्त्र ' हा क्रियाविकल्पनाचा ग्रंथ आहे; ' भामह–रुद्रट ' या काल-खंडांत धर्ममुखाने होणारी ही चर्चा 'आनंदवर्धन-मम्मट' या कालखंडांत व्यापारमुखाने होऊं लागली आणि मम्मटानंतर मात्र संस्कृत साहित्य–शास्त्रपद्धति सर्वस्वीं मम्मटानुसारी बनलेली दिसते. हे विकासाचे टप्पे म्हणजे परस्परविरोधी संप्रदायांचे निदर्शक नाहीत. भरताचा रससंप्रदाय, भामहाचा अलंकारसंप्रदाय, वामनाचा रीतिसंप्रदाय, आनंदवर्धनाचा ध्वनिसंप्रदाय, कुंतकाचा वक्रोक्तिसंप्रदाय आणि क्षेमेंद्राचा औचित्यसंप्रदाय असें म्हण-तांना आपण मूळ विचारांची व हेतूंची फार गफलत करीत आलों असें प्रा. ग. त्र्यं. देशपांडे यांचें मत आहे; कारण भामहाचा ' अलंकार ' रस किंवा गुणविरोधी नाही, वामनाची ' रीति ' रस किंवा अलंकाराशीं विरोधी नाही, आनंदवर्धनाचा ' ध्वनि ' गुणालंकारांशीं विरोधी नाही. या तीनहि गोष्टी तिघांनाहि मान्य आहेत. साहित्यशास्त्राचा इतिहास पाहतां त्यांतील विचार उत्तरोत्तर सूक्ष्म होत गेलेला दिसून येतो; यामुळे इ. स. पूर्व २०० ते इ. स. १७०० पर्यंत या भिन्न भिन्न विचारधारांनी संस्कृत साहित्य–शास्त्राचा मूलस्रोत कसा फोफावत गेला याचें साकल्यानें चित्र आपल्या डोळ्यांपुढे उभें राहतें. हें सर्व करतांना भारतीय साहित्यशास्त्र व तत्त्वज्ञान यांचा लेखकाचा गाढ व्यासंग दृष्टोत्पत्तीस येतो. न्याय, व्याकरण, मीमांसा, धर्मशास्त्र, इ० तत्त्वज्ञानाच्या मूलग्रामी अभ्यासाविना संस्कृत साहित्यशास्त्राचा उलगडा कसा होऊं शकत नाही तेंहि या ग्रंथाने स्पष्ट केलें आहे. म. म. काणे, डॉ. सुशील कुमार डे, डॉ. शंकरन्, डॉ. लाहिरी, डॉ. राघवन्, डॉ. दासगुप्ता इत्यादि विद्वानांच्या संशोधनकार्याचा लेखकाने मार्मिकपणें उपयोग करून घेतला आहे हें खरें, पण त्यांचें अंधानुकरण मात्र केलेलें नाही. यासाठी प्रा. ग. त्र्यं. देशपांडे यांनी ' भामह रस-विरोधी की रसानुकूल ? ' यावर केलेली चर्चा अवश्य अभ्यसनीय आहे.

ग्रंथाच्या उत्तरार्धांत मम्मटापर्यंत विकसित झालेल्या साहित्यशास्त्रीय सिद्धांतांचें त्याच्याच क्रमानुसार स्वरूपविवेचन करण्यांत आलें आहे. यांत ' रसविवेचना'ला प्राधान्य स्वाभाविकपणेंच लाभलें आहे. प्रा. ग. त्र्यं. देशपांडे हे भरताचा ' भावयति ' हाच पक्ष असल्याचें सिद्ध करतात. लोल्लट, शंकुक, भट्टनायक व अभिनवगुप्त यांच्या मतांचें आजवर विवेचन झालें होतें; त्यांपूर्वी प्रचलित असलेल्या आठ मतांचा विचार, तसेंच भट्टतौताचें मत मराठींत प्रथमच येथे मांडण्यांत येत आहे. रसविघ्नासंबंधींचा विचार, स्थायिविलक्षण रस, सामान्यरस आणि विशेषरस यांचें या ग्रंथांतील विवेचन अभिनव वाटतें. अभिनवगुप्ताने केलेलीं पूर्वमतांचीं परीक्षणे इतक्या सविस्तरपणें आजवर मिळालीं नव्हतीं. विशेषतः आनंद-

वाद व सुखदुःखवाद[२२] यांच्या भिन्न परंपरांवर टाकलेला प्रकाश मूल वस्तु विशद करणारा आहे. तसेंच ध्वनिवादी व त्यांचे विरोधक यांचा भूमिकाभेद स्पष्ट करून आनंदवर्धनाने काव्याचें विवेचन प्रतिभेच्या बळावरून केल्यामुळे तें कसें निर्दोष झालें आहे तेंहि या ग्रंथांत अपूर्वतेने पाहावयास मिळतें; आणि विशेष म्हणजे प्रा. ग. त्र्यं. देशपांडे यांची जागोजाग दृग्गोचर होणारी अभिजात रसिकता. ' उत्तरार्धांतील सिद्धान्तांचें विवेचन वाचीत असतांना आपण एखादी ललितकृति वाचीत आहों असा भास होण्याइतकें तें विवेचन रसाळ उतरलें आहे ' असा अभिप्राय डॉ. म. गो. माईणकरांनी[२३] याबाबत दिलेलाच आहे.

संस्कृतसाहित्य व साहित्यशास्त्र यांपासून फटकून वागणारें मराठी साहित्य व साहित्यशास्त्र यांस आज या ग्रंथाचा कांही प्रत्यक्ष उपयोग आहे काय? या ग्रंथाने मला वाटतें, संस्कृत साहित्यशास्त्रासंबंधींची उपेक्षाबुद्धि दूर होईल. या शास्त्रांतील सूक्ष्म व मूलगामी विश्लेषणपद्धति पाहून केवळ इंग्रजी टीकेंतील वारकाव्यांनी भुलून गेलेल्या आधुनिक एकाक्ष टीकाकारालाहि या शास्त्राचा मोह पडेल आणि रसिकतेचे नवनेत्र लाभतील. विदग्ध गोष्ठी, कवि, नागरक, समाज आणि सहृदय यासंबंधींचें विवेचन, महाकाव्य आणि नाटक, प्रतिभान आणि अलंकार, काव्यसत्य, साहित्याचें लक्षण यांवरील चर्चा आपल्या मनांतील अस्पष्ट कल्पना अधिक स्पष्ट करविणाऱ्या आहेत. ' चारुत्वप्रतीतिः काव्यस्यात्मा ' पासून ' रमणीयार्थ-प्रतिपादकः शब्दः काव्यम् ' पर्यंत आलेलें संस्कृत साहित्यशास्त्रांतील 'सौंदर्यकल्पने'चें विवेचन वाचकाला मुळाकडे खेचणारें आहे. संस्कृत साहित्यशास्त्रावर ' रसविमर्श 'कारा-इतकें मनापासून प्रेम करणारे रा. ग. त्र्यं. देशपांडे अभ्यासकांना आपल्या ग्रंथावरहि निःसंशय प्रेम करावयास लावतील. हा ग्रंथ जर हिंदींत किंवा इंग्रजींत प्रसिद्ध झाला तर त्याला अखिल भारतीयत्वाचा मान स्वतःसिद्ध गुणांवरून लाभेल याबद्दल संदेह नाही.

१९५८ सालांतील मराठी टीका-साहित्य एका बाजूला काव्याच्या मूल्यमापनांतील सौंदर्य-शास्त्राच्या मर्यादा निश्चित करणारें, कलात्मक सौंदर्य धारण करणारें पण अल्पप्राण अशा साहित्याची योग्य ती किंमत करणारें व महाकाव्यांतील समग्र मानवी जीवनाला तळापासून ढवळून काढणाऱ्या विराट् सामर्थ्याची ओढ लावणारें असें आहे; तर दुसऱ्या बाजूला उपेक्षिताचें जिणें जगणाऱ्या संस्कृत साहित्यशास्त्राला पुन्हा मानाचें व प्रतिष्ठेचें स्थान देणारें आहे.

२२. जाड टाइप माझा. काव्यानंदमीमांसा ' सस्मित समाधि ' या शब्दांनी करण्याचा प्रयत्न श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांनी इंदूर येथील महाराष्ट्र साहित्य सभेच्या शारदोत्सवांतील आपल्या भाषणांत केला आहे. यापूर्वीहि १९५३ सालीं मुंबई मराठी ग्रंथ-संग्रहालयाच्या द्वितीय स्नेहसंमेलनाच्या प्रसंगीं त्यांनीं ही उपपत्ति मांडली होती. डॉ. के. ना. वाटवे यांनी १९-४-५३ च्या 'केसरीं'तून ह्या उपपत्तीचा निर्भीडपणें समाचार घेतला होता. जिज्ञासूंनी हें सर्व विवेचन मुळांतून पाहावें.

२३. डॉ. म. गो. माईणकर—संस्कृत साहित्यशास्त्र व त्याचा विकास, ' साधना ' २९ नोव्हेंबर १९५८.

टीप :—वरील समालोचनांत ग्रंथ, दिवाळी अंक, कांही साहित्यकार यांच्यावरील अभिप्राय, परिचय, परामर्श इ० लेखरूपाने किंवा ग्रंथरूपाने झालेली जी टीका आहे तिचा

समावेश करण्यांत आलेला नाही. तसेंच कांही वाङ्मय प्रकारांवरील टीकालेखन, वाङ्मयेतिहास यांनाहि वगळलेलें आहे. केवळ समीक्षाशास्त्रांतील मूलतत्त्वांची चिकित्सा करणारे, आजकालच्या वाङ्मयाचें निदान करून उद्याची चिंता वाहणाऱ्या अशाच टीकालेखांचा व ग्रंथांचा परामर्श येथे घेतला आहे व त्यांतून अधिकृत होणारा सिद्धान्त मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

पुढील ग्रंथांचा अल्प परामर्श मी माझ्या व्याख्यानांत घेतला होता—(१) वाङ्मयाचा वाफा–य. न. केळकर. (२) ‘ जीवन-चिंतन ’–स. ज. भागवत. (३) वरेरकर आणि मराठी रंगभूमि–द. रा. गोमकाळे. (४) सावरकर–विविधदर्शन. (५) बहुरूपी ( खास ‘ गडकरी ’ खंड )–चिं. कोल्हटकर. (६) चिंतनलहरी–प्रा. श्री. मा. कुलकर्णी. (७) आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास ( खंड २ )-प्रा. अ. ना. देशपांडे. (८) नाट्यसंगीत–ह. रा. महाजनी ( ‘ अनुभूति आणि अभिव्यक्ति ’ हें श्री. भ. प्र. मोहरीस यांचें पुस्तक मला मिळूं शकलें नाही. ) ● ● ●

## रा. भि. जोशी

# संकीर्ण ललितगद्य

एका वर्षाचा लहानसा कालावधि घेऊन त्या अवधींत प्रकाशित झालेल्या साहित्याचा आढावा घेण्याचा उद्देश, त्या अवधींत त्या त्या साहित्यप्रकारांत कांहीं विशेष भर पडली काय हें पाहणें, आणि तोंवर प्रसिद्ध झालेल्या त्या प्रकारांतल्या सर्व साहित्याशीं आणि त्याच लेखकाच्या तोंपर्यंतच्या त्याच प्रकारच्या लेखनाशीं शक्य तर संबंध जोडणें हा असतो. प्रत्येक पुस्तकाचें सविस्तर परीक्षण करणें हा नव्हे. परंतु आपल्याकडे, लेखांचें स्फुट स्वरूपांतलें नियतकालिकांतलें प्रकाशन आणि त्यांचें संग्रहरूपाने प्रकाशन ह्यांत बहुधा इतका काळ जातो की, समालोचनाला काळसापेक्षता राहूं शकत नाही. उदाहरणार्थ, १९३५ ते १९४५ ह्या अवधींतल्या एखाद्याच्या लेखांचा संग्रह जर १९५८ मध्ये प्रकाशित झाला तर त्याचें तुलनात्मक समालोचन कोणत्या कालांतल्या साहित्याशीं करायचें ? तें प्रकाशन योग्य कालीं प्रकाशित झालें असतें तर त्या कालांत तें बसूं शकलें असतें आणि त्याचें जें काय स्थान असेल तें त्याला मिळूं शकलें असतें. तें नंतर त्याला मिळणें कठीण जातें कारण कोणत्याहि साहित्य-प्रकारांत ज्याचें स्वरूप प्रभावी आणि प्रत्ययकारिता टिकणारी असते असें साहित्य मोजकेंच निर्माण होतें. त्या त्या कालांत प्रतिष्ठा किंवा प्रसिद्धि मिळवून देणाऱ्या लेखनाची साहजिकच नक्कल होऊं लागते. एखाद्या साहित्य-प्रकाराचा विस्तार करण्याचें, तें समृद्ध करण्याचें, त्याचें स्वरूप स्थिर करण्याचें कार्य हें विपुल प्रमाणांत प्रकाशित होणारें दुसऱ्या-तिसऱ्या दर्जाचें साहित्य करीत असतें. त्यांतूनच त्या प्रकारांतल्या साहित्याचीं वैशिष्ट्यें अधिकाधिक स्पष्ट होत असतात. पण त्याबरोबरच हळूहळू त्याच्या विकृतीला आणि ऱ्हासालाहि सुरवात होते, असा सामान्यतः क्रम दिसतो. हें दुसऱ्या-तिसऱ्या प्रकारचें साहित्य दीर्घ काल निर्माण होत राहतें ह्याचें कारण तसें होणें स्वाभाविक आहे हें तर आहेच, पण त्याबरोबर त्याचें दुसरें कारण असें आहे की, तें स्फुटरूपाने प्रकाशित होत असतांना त्याचें परीक्षण होत नाहीं; आणि जेव्हा तें संग्रहरूपाने प्रकाशित होतें तेव्हा बहुधा इतका काळ गेलेला असतो की, परीक्षणांचा उपयोग होत नाही.

१९५८ सालीं प्रकाशित झालेल्या संकीर्ण ललितगद्य पुस्तकांकडे पाहिलें म्हणजे तिथेहि बऱ्याच बाबतींत प्रकाशन-कालाचा हा दूरान्वय दिसून येतो. उदाहरणार्थ, कुलभाबाई पाणंदीकरांच्या "व्यक्ति तितक्या प्रकृति" या संग्रहांतलीं व्यक्तिचित्रें १९४१ ते १९५७ ह्या दीर्घ अवधींत लिहिलीं गेलेलीं दिसतात तर "स्पर्शांची पालवी" ह्या संग्रहांतले निबंध १९४९ ते १९५७ ह्या अवधींतले आहेत. पण सुदैवाने ह्या वर्षांतलीं कांही पुस्तकें तरी अशीं आहेत की, त्यांतले लेख पुष्कळ वर्षांपूर्वीं प्रसिद्ध झालेले असले तरी त्यांचा ताजेपणा कमी झालेला नाही.

मराठींतलें प्रवासलेखन हें आता पुष्कळच व्यक्तित्वसंपन्न झालेलें आहे. आपण केलेल्या प्रवासाची आणि पाहिलेल्या स्थळांची नुसती हकीगत किंवा माहिती दिल्याने प्रवासलेखन हें साहित्य ह्या संज्ञेला पात्र होत नाही ही गोष्ट आता लेखक-वाचकांना अधिकाधिक प्रमाणांत जाणवूं लागली आहे. जेव्हा एखादा सुशिक्षित, सुसंस्कृत, संवेदनक्षम मनुष्य एखादें स्थळ किंवा एखादा प्रसंग पाहतो तेव्हा त्याचें मन नुसतें कॅमेऱ्याच्या काचेप्रमाणे त्या स्थळ-प्रसंगाचें प्रतिबिंब पाडून घेत नाही, तर तें स्वतः सक्रिय असतें. आपल्या पूर्वसंस्कारांसहित त्या स्थळ-प्रसंगांना तें सामोरें जातें. निदान त्याने जावें अशी स्वाभाविक अपेक्षा असते. तसें झालें तरच स्थळ पाहिलें किंवा प्रवास केला ह्याला कांहीतरी अर्थ येतो; आणि अशा सामोरें जाण्यांतून निर्माण झालेलें प्रवास-लेखन साहित्य ह्या संज्ञेला पात्र होण्याचा संभव असतो. स्थळ आणि व्यक्ति ही प्रवासांतल्या अनुभूतींचीं दोन अंगें आहेत. हीं दोन अंगें परस्परांचें जें आणि जसें दर्शन घडवतात त्यावर त्या लेखनाची साहित्यिक गुणवत्ता अवलंबून असते.

अनुक्रमणिका

१९५८ सालीं प्रकाशित झालेल्या प्रवास-पुस्तकांत अमेरिकेवर आणि चीनवर प्रत्येकी दोन-दोन आहेत. त्यांवरून त्या त्या लेखकाच्या व्यक्तित्वानुसार आणि उद्दिष्टानुसार त्या प्रवासलेखनांत कसा फरक पडला आहे तें दिसून येतें. श्री. जयंत दळवी ह्यांचें ' लोक आणि लौकिक ', आणि डॉ. प्र. न. जोशी ह्यांचें ' नव्या जगांत सहा महिने ' हीं दोन पुस्तकें अमेरिकेसंबंधीचीं आहेत. दळवी अमेरिकेंत सुमारें तीन-चार महिने राहिले असतील. डॉ. जोशी सहा महिने राहिले. दोघांनीहि अमेरिकेसंबंधी अवश्य ती सर्व माहिती मिळवली आहे आणि तिचा प्रवास-लेखनांत उपयोग केला आहे. ( माहितीच्या दृष्टीने डॉ. जोशांचें पुस्तक अधिक भरगच्च आहे.) दोघांनीहि अमेरिकन जीवन आणि माणसें ह्यासंबंधीच्या आपल्या प्रतिक्रिया निःसंकोचपणें दिल्या आहेत. दोघांजवळहि वर्णनशक्ति चांगली आहे. दोघांमध्येहि पुरेशी अलिप्तता, प्रगल्भता आणि चिकित्सक वृत्ति आहे; आणि दोघांनीहि आपल्या पुस्तकाची सुरुवात सांताक्रूझला विमानांत बसल्यापासून केली आहे. दोघांचीहि पुस्तकें आपापल्या परीने चांगलींच आहेत; पण त्या चांगलेपणांत त्यांची जात वेगळी होण्याइतका फरक आहे. श्री. दळवींचें लेखन इतकें खेळकर, खुसखुशीत आणि मिस्किल आहे की, पहिल्या वाक्या-पासून ते वाचकाच्या मनाची पकड घेतें आणि शेवटपर्यंत सोडीत नाही. त्यांत स्वतःची आणि इतरांची थट्टा आहे, गंमती आहेत आणि पुस्तकाचा सगळा थाट असा आहे की, आपण सर्व प्रवासभर त्यांच्याबरोबर आहों असें वाटतें. ते आणि आपण ह्यांतलें अंतरच नाहीसें झालें आहे. डॉ. जोशांचें पुस्तक वाचूनहि पुष्कळ समाधान मिळतें. अमेरिकन जीवना-विषयी विविध अशी पुष्कळ माहिती मिळते. पण ती माहिती द्यायला निघालेला एक मनुष्य भरपूर माहिती देत आहे अशा पद्धतीने मिळते; आपण त्यांच्याबरोबर आहों असा प्रत्यय त्यांतून येत नाहीं. पण तो त्यांचा उद्देशहि असल्याचें दिसत नाही. त्यामुळेच चांगलीं असूनहि हीं दोन पुस्तकें वेगळ्या जातीचीं झालीं आहेत.

चीनसंबंधीचीं पुस्तकें एक सौ. सुलोचना लिमये ह्यांनी केलेलें, राजा हथीसिंग ह्यांच्या Great Peace ह्या पुस्तकाचें ' यांगत्सेच्या तीरावर ' हें मराठी भाषांतर आणि दुसरें श्री. रा. कृ. पाटील ह्यांचें ' भारत आणि चीन ' हें पुस्तक. श्री. हथीसिंग ह्यांनी १९५१ आणि १९५२ अशा दोन वेळीं चीनचा प्रवास केला. ते राजकारण चांगलें जाणतात. एक वेळ ते कॉंग्रेसमध्ये होते, पण आता ते सत्ताधिष्ठित कॉंग्रेसच्या विरुद्ध आहेत आणि कम्यूनिझमचे तर कट्टर विरोधक आहेत. आपलीं मतं ते निर्भयपणें मांडतात. साह-जिकच त्यांनी चीनचा प्रवास खूपच उघड्या डोळ्यांनी केला, आणि शक्य तेव्हा तिथल्या लोकांना पेचांत टाकणारे प्रश्न विचारले. ह्या त्यांच्या दृष्टिकोनांतून त्यांचें पुस्तक निर्माण झालें आहे. पुस्तकाचें भाषांतर सर्वस्वीं विसंबण्याजोगें झालें आहे की नाही ह्याविषयी शंका येते. कारण एका ठिकाणीं चीनची लोकसंख्या चारशे कोटि आहे असें म्हटलें आहे. तें बहुधा ' मिलियन ' चें भाषांतर ' कोटि ' केलें असावें.

श्री. रा. कृ. पाटील हे मुरलेले कारभारी आहेत. त्यांचीहि आजच्या सत्ता-धिष्ठित कॉंग्रेसवर श्रद्धा नाही. ती सर्वोदयावर आहे आणि लोकशाहींतल्या मूलभूत तत्त्वांवर आहे. तेहि डोळस आहेत. त्यांचेहि प्रश्न चिनी लोकांना केव्हा केव्हा अडचणींत टाकतात; पण ते त्यांनी अडचणींत टाकण्यासाठीं विचारलेले नसतात. चीनमध्ये झालेली क्रांति श्री. हथीसिंगांनी मान्य केली आहे. तिथल्या कांही गोष्टींबद्दल श्री. पाटलांचेंहि मत अनुकूल झालें. चीनमधल्या सबंध कम्युनिस्ट भूमिकेला हथीसिंगाचा विरोध आहे. तिथे जें कांही साध्य झालें त्यासाठी माणुसकीची फार मोठी किंमत द्यावी लागली आहे असें वाटतें. श्री. पाटलांनाहि चीनमधल्या

सर्व गोष्टी पसंत आहेत असें नाही. त्याबाबत ते साशंक आहेत. पण चीनने पुष्कळ गोष्टी–चांगल्या गोष्टी–साधल्या आहेत असें त्यांना वाटतें. श्री. हर्षसिंगांची निषेधरूप प्रतिक्रिया आणि श्री. पाटील यांची बव्हंशीं संमतिरूप प्रतिक्रिया अशा दोन प्रतिक्रियांचीं निदर्शक हीं दोन पुस्तकें आहेत. दोन्ही पुस्तकें प्रथमपुरुषी लिहिलेलीं आहेत आणि दोन्हींतहि त्या त्या लेखकाच्या चीनमधल्या अनुभवांसंबंधींच्या प्रतिक्रिया आल्या आहेत. श्री. पाटलांच्या पुस्तकांतला दैनंदिनी भाग अधिक मनमोकळा आणि जिव्हाळ्याचा आहे. पण दोन्ही पुस्तकांचा उद्देश लोकांना शहाणे करण्याचा आहे. ह्यांपैकीं कोणत्याहि पुस्तकाची ललित साहित्यांत गणना होणार नाही.

१९५५ मध्ये फिन्लंडमधल्या हेल्सिंकी ह्या ठिकाणीं भरलेल्या विश्वशांति-परिषदेला हजर राहण्यासाठी श्री. लालजी पेंडसे तिथे गेले होते. त्या प्रवासाचें वर्णन त्यांनी ‘मध्यरात्रीचें सूर्यदर्शन’ ह्या पुस्तकांत केलें आहे. पण ह्या शंभर पानांच्या पुस्तकांत सरासरी चोवीस पानें हेल्सिंकीपर्यंतच्या प्रवासाचें वर्णन आहे; आणि फिन्लंडच्या उत्तर भागांत ओहलो ह्या नांवाच्या एका ठिकाणीं जाऊन त्यांनी मध्यरात्रीं सूर्यदर्शन घेतलें त्याला दोन-तीन पानें दिलीं आहेत. बाकीचीं सगळीं पानें फिन्लंडसंबंधींची माहिती, परिषदेचा वृत्तान्त, आर्यांच्या मूलस्थानासंबंधी कांही तर्क–पुरावे, फिनी–रूसी–संस्कृत भाषांतील ह्यांना दिलीं आहेत. माहिती आणि प्रवास हीं दोन्ही एकमेकांत मिसळून गेलीं नसून त्यांची वांटणी झाली आहे त्यामुळे डॉ. जोशांच्या किंवा श्री. हर्षसिंगांच्या पुस्तकाला जशी एकात्मता आली आहे तशी ह्या पुस्तकाला आलेली नाही; आणि माहितीपैकींहि पुष्कळ भाग असा आहे की, ज्यासाठी फिन्लंडला जावें लागावें. त्यामुळे ह्या पुस्तकाला जीवनदर्शन घडवणारें किंवा दृष्टिकोन व्यक्त करणारें पुस्तक म्हणूनहि–ह्या दोन्ही गोष्टी त्यांत कांही अंशीं असूनसुद्धा–महत्त्व येऊं शकत नाहीं.

हीं पांचहि पुस्तकें परदेशांत केलेल्या प्रवासासंबंधीचीं आहेत. ह्या देशांतल्या प्रवासासंबंधीच्या पुस्तकांपैकी ‘ऊन आणि गारठा’ ह्या पुस्तकांत मला वाटतें, श्री. शशिकांत पुनर्वसू ह्यांचे सगळेच प्रवासलेख आले आहेत. श्री. पुनर्वसूंचें मन अतिशय संस्कारक्षम आहे, सौंदर्यशाली आहे. त्यांची दृष्टि बारकावे वेंचणारी आहे आणि लेखणी सौंदर्याचें बारकाव्याने वर्णन करण्याला समर्थ आहे. त्यांच्या हाताला हळुवारपणा आहे. कुरूप आणि अमंगल त्यांना खपत नाही. सुरूप आणि मंगल पाहून त्यांचें मन फुलासारखें उल्हसून जातें. त्यामुळेच हिमालय, गोवा, कारवार, कर्नाटक, गिरसप्पा या भागांतल्या प्रवासासंबंधीचे त्यांचे लेख फार परिणामकारक वठले आहेत. हिमालयांतलें किंवा हरिद्वारचें, कारवारच्या समुद्रतीराचें किंवा गोव्यांतल्या झाडारायांचें, तसेंच गिरसप्पाच्या धबधब्याचें त्यांनी जिवंत आणि मनोज्ञ वर्णन केलें आहे. पण केव्हा केव्हा त्यांच्यांतला भाष्यें करणारा आणि कुठे गेलों, काय केलें हें सांगणारा “मी’ फार पुढे येतो; तर कधी त्यांचा सौंदर्यासंबंधीचा उल्हास त्यांना अधिक वाटेल असें लिहायला लावतो. त्यामुळे त्यांच्या लेखनाची पातळी मधूनच एकदम एरवीच्या काव्यात्मतेपासून खाली येते. ललित आणि ललितेतर अशा दोन्ही बाजूंना झुकूं पाहणाऱ्या लेखनांतलें ‘मी’चें स्थान, आणि ललित-अललित ह्यांतील तोल निश्चित करणें आणि संभाळणें चोखंदळ माणसालाहि कठीण जावें असें आहे हेंच ह्यावरून दिसतें.

प्रवास-लेखनाला हल्ली जें आत्मपर स्वरूप आलें आहे त्याची श्री. बाळशंकर देशपांडे ह्यांना कल्पना आहे हें त्यांच्या ‘माझा उत्तर हिंदुस्थानचा प्रवास’ ह्या पुस्तकांत दिसतें. पण नुसती ही जाणीव पुरत नाही. ‘अपरिचित भागातून प्रवास करतांना मोठ्या उत्कंठेने खिडकीबाहेर डोकावून आजूबाजूच्या प्रदेशाचें निरीक्षण करण्याचा मला षौक आहे,’ हें विधान

करून आपण आपल्यासंबंधी विशेष काय सांगतां ह्याचा त्यांनी विचार केला नाही. तसेंच 'अन् मी तिथल्यातिथं पुढीलप्रमाणं दोन-तीन शेर–शेर कसले ? शेराश सव्वाशेरच होते ते–रचले. ' ह्यांतल्या विनोदाच्या स्वरूपाची पारख करायलाहि ते थांबले नाहीत. असें प्रवासलेखन करण्याऐवजी त्यांनी आपल्या प्रवासाचें सरळ वर्णन केलें असतें तर तें कमी उपयुक्त झालें असतें असें नाहीं.

श्री. केशव बळवंत जोशी ह्यांचें 'पवित्र भारतदर्शन ' हें एक असें उपयुक्त, मार्गदर्शक पुस्तक आहे. शंभर-सव्वाशें पानांच्या ह्या पुस्तकांत कन्याकुमारीपासून कैलास-मानस सरोवरापर्यंत आणि द्वारकेपासून कलकत्त्यापर्यंतच्या शंभरांवर स्थलांचें वर्णन आणि प्रवासवर्णन आलें आहे. साहजिक दोन तीन ओळींपासून दोन-तीन पानांपलीकडे कोणत्याहि स्थळाला जागा मिळालेली नाहीं. बहुतेक ठिकाणांचें माहात्म्य आणि महत्त्वाची माहिती प्रवासवर्णनासुद्धा ह्या पुस्तकांत आली आहे.

'लोक आणि लौकिक', 'ऊन आणि गारठा ' ह्यासारखीं पुस्तकें प्रसिद्ध होत असतांनाच, उपयुक्त आणि माहितीपर अशीं वर उल्लेखिलेलीं पुस्तकें आणि 'मीं पाहिलेला रशिया', 'मुरूड–ऐतिहासिक आणि सांस्कृतिक', 'रत्नागिरी जिल्हा-आज आणि उद्या ', 'विश्वाच्या कळसावर ' वगैरेहि प्रसिद्ध होत आहेत हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

**निबंध :**

'स्पर्शाची पालवी' ह्या संग्रहांतल्या निबंधांचे लेखक श्री. गो. वि. करंदीकर म्हणजे कवि विंदा करंदीकरांच्या व्यक्तित्वाचा गद्य लेखक पैलू आहे. स्पर्शादि इंद्रियगम्य अनुभव ओढीने आणि जोमाने घेण्याची शक्ति, सूक्ष्म आणि उत्कट संवेदनक्षमता, कणखर भावनात्मकता, जें इंद्रियजन्य आहे त्याच्यामागे, मागच्याच्याहि मागे, आकाशाच्या पलीकडे, आधीच्या आरंभीं जाण्याची ओढ, युगांयुगांतून आत्म्याला प्रवास करायला लावायची आकांक्षा, कठीण विचारांशीं टक्कर घेण्याची खुमखुमी हे करंदीकरांच्या काव्यांतले गुण त्यांच्या या निबंधांतहि आहेत. त्याखेरीज बालपणीच्या अनुभवांसंबंधीचा एक वेगळाच हळुवारपणा, नित्याच्या व्यवहारामागच्या मनोव्यापारांत डोकावणें, आणि ज्या विषयांचा विस्तार कवितेला मानवणार नाही असे विषयहि त्यांच्या निबंधांत येतात. 'हॅम्लेटची चूक ' सारख्या एखाद्या निबंधांत त्यांच्या कांहीं कवितांत आढळणारी क्लिष्टताहि आढळेल. असे कवि करंदीकर आणि निबंधकार करंदीकर हे एकमेकांचे पूरक आहेत. ललित निबंधांत पवित्रा हा थोडाबहूत येतोच. पण करंदीकरांचा पवित्रा हा पवित्रा न वाटतां नव्या दृष्टिकोनांतून अनुभवाकडे पाहाण्याचा प्रयत्न वाटतो. तसाच तो वाटायला पाहिजे नाहीतर निबंधांना खोटेपणा येईल. लिहितांना मध्येच सांधा बदलून विचारांची गाडी दुसऱ्या मार्गाने ते नेतात आणि एकदम एखाद्या तत्त्वाकडे किंवा सत्याकडे जातात. त्यामुळे अनपेक्षितपणें नवेंच ठिकाण दिसल्याचा आनंद मिळतो. 'न चुकणाऱ्या माणसां ' बद्दल ते म्हणतील, 'आपल्याला पाय ठेवण्यासाठींच सबंध पृथ्वी परमेश्वराने आपल्या पायाखाली सरकवली असावी ह्याबद्दल त्यांना संदेह नसतो." ह्या एका वाक्याने न चुकणाऱ्या माणसांच्या अहंभावाला केवढें जगड्व्याल परिमाण दिलें आहे त्यांनी ! आणि ते परमेश्वराला आपल्या पायांखालचें स्टूल सरकावणारा समजतात. हें सुचवून त्यांना किती खजील केलें आहे ! मुंबईतल्या माणसांचा लवचीकपणा त्यांना माणसांच्या गर्दीतूनच नव्हे तर वादांच्या धुमश्चक्रींतूनहि सहीसलामत निसटायला कसा मदत करतो हें सांगून ते लगेच म्हणतात, 'शिवाय दोन वादांच्यामध्ये एक बारीकशी फट असतेच ! '

त्या विधानांतलें—कोणत्याहि वादांच्या स्वरूपासंबंधींचें - सत्य एकदम समोर येतें, चकित करतें, आणि निबंधांतलें म्हणून नव्हे तर तें खरेंच सत्य असल्यामुळे आपल्या ठसाहि उठवतें.

'बोहारणीचें बोचकें ' ह्यांतला "तिची हांक प्रथम स्वयंपाकघरांत ऐकायला जाते आणि नंतर दोन मिनिटांनी माझ्या कानांवर पडते." ह्या वाक्यांतलें मनोवैज्ञानिक सत्य आणि सबंध निबंधांतलें व्यावहारिक सत्य यांची मिळणी मोठी मजेदार आहे.

ह्या असल्या विचारप्रधान निबंधांइतकेच परिणामकारक 'स्पर्शांची पालवी,' 'पहिला पाऊस', 'आवाजाची दुनिया' अशांसारखे निबंध आहेत आणि त्यांतूनहि विशेष म्हणजे 'मामाचें घर', 'पानगी', 'स्नेही,' 'या माझ्या पाऊलवाटा' यांसारखे निबंध आहेत. 'स्नेही' आणि 'मामाचें घर' हे बरेचसे शब्दचित्रांसारखे आहेत. पण 'पानगी' हा एक अत्युत्कृष्ट निबंध आहे. त्याला अनेक पदर आहेत. त्यांत दिसायला अतीव साधेपणा आहे. त्याबरोबरच काव्यनिर्मितींत कलावंताच्या अनुभवाला येणाऱ्या अडचणींची चर्चा आहे. पण निबंधाचें सगळें रहस्य मथू आत्ते जें म्हणते त्यांत आहे, "अरे तुला पानगी आवडते ना? केलें कायतरी. आपला पूर्वीचाच राहिला असलास तर आवडेल." ह्या एका वाक्यामुळे निबंधाला एक प्रतीकात्मकता आली आहे. 'पानगी' ही बालपणाच्या सर्व साध्या निर्भेळ सुखानुभवांची प्रतीक झाली आहे. 'या माझ्या पाऊलवाटा' हा निबंध पाऊलवाटांना वेगवेगळ्या भाव-भावनांचे प्रतीक करतांना थोडासा रचल्यासारखा झाला आहे. पण 'आता मी मामाकडे जातों पण आजोळीं कधींच पोंचत नाही. आजोळी जायचें असेल तर पाऊलवाटेनेच जावें लागतें" ह्या वाक्यानें सगळा निबंध काव्यात्म झाला आहे.

काणेकरांनंतर ललितनिबंध हा लेखनप्रकार बराच मंदावला होता. त्याला अवकळा आल्यासारखी दिसत होती. कुठे कुठे कलाकुसर होती; पण जोम, जिवंतपणा कमी झाल्यासारखा दिसत होता. तसें वाटण्याचें कारण आता राहिलें नाही.

ललितनिबंधांत खेळकरपणा असावा, चमत्कृति असावी, एखादी नेहेमीपेक्षा थोडीशी वेगळी भूमिका घेतलेली असावी, असा जो ललितनिबंधाच्या सजावटीचा, घाटदारपणाचा सांचा झाला होता त्याचा नमुना डॉ. वि. पां. दांडेकर ह्यांच्या 'रातराणी' ह्या संग्रहांत सापडेल ! ह्यांत त्यांच्या आतापर्यंत प्रकाशित झालेल्यांपैकी निवडक निबंध आहेत. 'आपले आवडते आवाज' आणि 'डामरी रस्ते' हे डॉ. दांडेकरांचे निबंध आणि 'आवाजाची दुनिया' आणि 'या माझ्या पाऊलवाटा' हे करंदीकरांचे निबंध. ह्यांचे विषय पुष्कळसे सारखे आहेत. त्या दोघांच्या लेखनांतला भेद दाखविण्याला हें साम्य पुरेसें आहे. रचना, सजावटीची ठाकठीक, वेगळेपणा दाखविण्याचा प्रयत्न हें सगळें डॉ. दांडेकरांच्या निबंधांत असलें तरी कुठें जिवंतपणाचा प्रत्यय येत नाही; आणि खरोखरच अनुभव कुठे जाणवला आहे असें वाटत नाही.

ललितनिबंधाप्रमाणेच व्यक्तिचित्रें हा लेखनप्रकारहि नष्ट होतो की काय असें वाटूं लागलें होतें. पण कांही वर्षांपूर्वी सुलभाबाई पाणंदीकर ह्यांच्या लेखणींतून उतरलेलीं व्यक्तिचित्रें येऊं लागलीं आणि ह्या लेखनप्रकाराला नवजीवन मिळालेसें दिसूं लागलें. 'व्यक्ति तितक्या प्रकृति' मध्ये सुलभाबाईंची सहृदयता, विचारांची आणि मनाची प्रगल्भता आणि सरलता, अलिप्तपणें जीवनाकडे आणि व्यक्तीकडे पाहण्याची समर्थता आणि कल्पकता ह्या सर्वांचा प्रत्यय येतो. त्यांच्या लेखनांत एक अनौपचारिक ताजेपणा आणि जिवंतपणा आहे. स्वभावांतले आणि वागण्यांतले बारकावे टिपून त्या जिवंत चित्र उभें करतात. त्यांच्या व्यक्तिचित्रांतल्या व्यक्ति अर्धसत्य आणि अर्धकाल्पनिक असल्या तरी संपूर्णपणें सत्य होऊनच त्या प्रकटतात.

सत्याला साजेशी कल्पनेची भर घालण्याचें सामर्थ्य सहृदयतेंत आणि कल्पकतेंत आहे. त्यांची लेखणी प्रसंगीं हळुवार, प्रसंगीं टोकदार, प्रसंगीं खेळकर कशी होते तें ' मास्तर ', ' काकांचा पाहुणचार ', ' काकांचें दुखणें ', ' मामा ' ह्यांत दिसतें. ती जेव्हा माणसाचें जग सोडून ' काळूराम ', ' कॅशिया ' आणि ' शेवगा ' यांचें चित्रण करते तेव्हाहि ती तितकीच प्रभावी ठरते. ' संगमाश्रम 'शीं सुलभाबाईंचें वेगळ्या प्रकारचे संबंध आले, त्यांचे बालपणचे कित्येक दिवस तिथे गेले. त्याच्याशीं त्यांच्या स्वतःच्या आणि डॉ. रामकृष्णपंत भांडारकरांच्या अनेक स्मृति निगडित झालेल्या आहेत. त्यामुळे त्याच्या चित्रणांत स्वाभाविकच कल्पनेपेक्षा वास्तवावर भर अधिक आहे; आणि त्यामुळेच ह्या चित्रणाला चारित्रात्मक–आत्मचरित्रात्मक स्वरूप आलें आहे; आणि म्हणूनच तें इतर चित्रांपासून वेगळें पडतें.

' समुद्राची देणगी ' हें ॲन मॉरो लिंडबर्ग ह्यांच्या Gift from the Sea ह्या पुस्तकाचें दुर्गा भागवत ह्यांनी केलेलें भाषांतर आहे. ह्या पुस्तकांत ॲन लिंडबर्ग ह्यांनी स्त्रियांच्या आयुष्यांतील प्रीति, विवाह, विवाहोत्तर जीवन ह्यांच्या अनुषंगानें उद्भवणाऱ्या प्रश्नांवरचे विचार व्यक्त केले आहेत, आणि ते गंभीर, तात्त्विक आणि मनोवैज्ञानिक भूमिकेवरून केले आहेत. घटस्फोट सहज शक्य असल्यामुळे अमेरिकन समाजांत विवाहोत्तर जीवनाचा प्रश्न अधिक जटिल झाला आहे. ॲन लिंडबर्ग ह्यांनी अतिशय समंजसपणें ह्या प्रश्नाकडे पाहिलें आहे. स्त्रीजीवनाच्या वेगवेगळ्या पैलूंचा किंवा टप्प्यांचा भाग एक एक शिंपला घेऊन त्यांनी त्याच्याभोंवतीं आपले विचार प्रसन्नपणें गुंफले आहेत. त्यामुळे हे निबंध सामान्य व्यावहारिक उपदेशापेक्षा वेगळ्या पातळीवर गेले आहेत. दुर्गाबाईंचें भाषांतर मात्र कांहींसें बोजड झालें आहे आणि बऱ्याच ठिकाणीं ओघहि खंडित झाला आहे.

सौ. विमलाबाई देशपांडे ह्यांनी ' घर आणि अंगण ' ह्या आपल्या लेखसंग्रहांतहि हल्लीच्या पिढींतल्या मुलींच्या जीवनांतले शिक्षण–विवाह–संसार ह्यासंबंधींचे प्रश्न घेऊन त्यांना उपयुक्त मार्गदर्शक उपदेश केला आहे; पण लेखन व्यावहारिक उपदेशाच्या पातळीपेक्षा वर मात्र जात नाहीं.

डॉ. सरोजिनीबाई बाबर यांच्या 'मंगलाक्षता' ह्या पुस्तकांत कांही स्त्रीगीतांची विषयवार प्रकरणशः विभागणी केली आहे आणि त्यांना भाष्यें जोडलीं आहेत. मिस्किलपणा, व्यंगदर्शन आणि मार्मिक दंभस्फोट हे जे विनोदी लेखनाचे विशेष ते श्री. वि. आ. बुवा ह्यांच्याहि लेखनांत आहेत. अगदी नित्याच्या परिचयाच्या अनुभवांतली विनोदी स्थलें ते हुडकून काढतात, किंवा त्यांच्याकडे विनोदाच्या काण्या डोळ्याने पाहतात. सामान्यपणें आपल्याला कल्पनाहि येणार नाही अशा नित्यानुभवांतला विनोद ते आपल्याला दाखवतात आणि आश्चर्याचा गमतीदार धक्का देतात. शारीरिक व्यंगें किंवा लकबी ह्यांच्यापेक्षा मनुष्यस्वभावांतल्या सर्वसाधारण व्यंगाकडेच त्यांचें लक्ष असतें. त्यांच्या वृत्तींत एकप्रकारचा खेळकरपणा आहे. त्यांचें निरीक्षण सूक्ष्म आहे, वाचन चौरस आहे; संस्कृत-मराठी वाङ्मयाचा त्यांचा परिचय चांगला आहे. त्यांच्या सर्वत्र लेखनांतून ह्याचा प्रत्यय येत असतो. ' आणखी एकाची भर ' ह्या त्यांच्या लेखसंग्रहांतले ' कांही शंका, ' ' शिष्ट लोकांची ( चेंगट ) संभाषणकला, ' आणि ' माझा दिवाळी अंक ' हे लेख त्यांच्या लेखन-वैशिष्ट्याचे उत्तम निदर्शक आहेत. कुत्सितपणा आणि अर्धप्रच्छन्न वैयक्तिक टीका हे विनोदी लेखनाला सहजपणें चिकटणारे दोष आहेत. त्यांपासून श्री. बुवा ह्यांचें लेखन अलिप्त असतें. जीवनांतील सर्वसामान्य अनुभव आणि सर्वसामान्य मानवी प्रवृत्ति आणि व्यंगें ह्यांवरच श्री. बुवा ह्यांचें लेखन आधारलेलें असतें, आणि बरेच वेळां ते स्वतःलादेखील आपल्या

विनोदांत ओढतात. त्यामुळे आणि त्यांतल्या एकंदर निरागसतेमुळे त्यांचें विनोदी लेखन कोणालाहि न दुखवतां सर्वांना आनंद देऊं शकतें.

'बटाट्याची चाळ' हें श्री. पु. ल. देशपांडे ह्यांनी उभें केलेलें कनिष्ठ मध्यम-वर्गाचें एक बहुरंगी जग आहे. चेष्टा, उपसंघ, उपहास, वक्रोक्ति, अतिशयोक्ति, विपर्यास इत्यादि सर्व विनोद-साधनांचा उपयोग श्री. देशपांड्यांनी त्यांत केला आहे. मुंबईतल्या मध्यम-वर्गाच्या वसाहतींत आढळून येणाऱ्या सर्व जाती; त्यांच्या संवयी, स्वभावविशेष, आवडी-निवडी, आकांक्षा, अपेक्षा, उपजीविकेचीं साधनें आणि उत्पन्नाच्या श्रेणी ह्या सर्वांचा त्यांत समावेश झाला असल्यामुळे त्यांचें हें जग समृद्ध आणि स्वयंपूर्ण झालें आहे. गंगाधर गाड-गिळांच्या गोष्टींतलीं 'कडलेलीं माणसें' ह्याच जगांतलीं आहेत; पण दोघांचा त्यांच्याकडे पाहणाऱ्या दृष्टिकोनांतल्या फरकामुळे आपल्या त्यांच्यासंबंधीच्या प्रतिक्रिया दोन ठिकाणीं दोन वेगळ्या होतात. 'बटाट्याच्या चाळी'संबंधी लिहिण्यासारखें सगळें लिहून झालें आहे (तूर्त तरी) असें वाटल्यानंतर श्री. देशपांड्यांनी 'चिंतन' ह्या लेखांत चाळीचा निरोप घेतला आहे. त्यांत उपरोध, गांभीर्याचें ढोंग (mock seriousness), आणि खिन्नता (pathos) यांचें मिश्रण येतें तें स्वाभाविक वाटतें.

श्री. पु. ल. देशपांडे ह्यांच्याइतका चतुरस्र मराठी विनोदी लेखक आजच्या पिढींत दुसरा कोणी नाही. रंगभूमि, चित्रपट, दुय्यम शाळेंतील आणि कॉलेजांतील अध्यापन, रेडियो इत्यादि वेगवेगळ्या क्षेत्रांतून त्यांचा संचार इतका झाला आहे की त्यांच्या बुद्धीची झेप सगळीकडे सारख्याच सराइतपणें पडते. त्यांतल्या त्यांत संगीत आणि वाङ्मय हे त्यांचे विशेष आवडीचे विषय आहेत. म्हणूनच त्यांची ओढाताण करणारे लोक श्री. देशपांड्यांचा विनोद होतात, आणि ह्या दोन विषयांचे उल्लेख आणि त्यांचीं विडंबनें त्यांच्या लेखांत वारंवार येतात. विडंबनाची ही त्यांची हातोटी त्यांनी फार वर्षांपूर्वी 'अभिरुचि' मध्ये एक छोटी कथा, इसाप, फडके, खांडेकर आणि माडखोलकर ह्या चौघांच्या शैलींत लिहिली तेव्हाच दिसून आली होती. त्यानंतर त्यांनीं महानुभावीय वाङ्मयापासून तों पाठारे प्रभूंच्या भाषेपर्यंत नानाप्रकारचें विडंबन केलें आहे. त्याचीं विपुल उदाहरणें 'बटाट्याची चाळ'मध्ये आहेत.

मराठी साहित्यांतील विनोद–विभाग आधीपासून समृद्धच आहे पण अत्रे–श्यामराव ओकांनंतर तो रोडावतो की काय असें मध्यंतरीं वाटूं लागलें होतें. पण आज दोन-चार लेखक तरी त्यांत चांगली भर घालीत आहेत. त्यांत श्री. देशपांड्यांचा मोठा हिस्सा आहे.

प्रवास, निबंध, व्यक्तिचित्रें हे लेखन–प्रकार ललित आणि ललितेतर ह्या दोन क्षेत्रांच्या सीमेवर कधी इकडे, कधी तिकडे झुकत असतात. त्यांत 'लालित्य' आणण्यासाठी पुष्कळदा ते सजवले जातात, आणि त्यांना घोटीव, सांचेबंद, स्वरूप देण्याचा प्रयत्न होतो. हे सगळे गद्य लेखनप्रकार आहेत. खडखडीतपणा, जोरकसपणा, सांच्यांत सापडण्याबद्दलची नाखुषी हा त्यांचा स्वभाव आहे, ह्याचा अशा वेळीं विसर पडतो. आज तर कवितादेखील सजावटी आणि सांचे टाकूं लागली आहे. गेल्या कांही वर्षांत, लेखनाचा आशय आणि त्याला मिळणारी आकृति ह्यांच्या परस्परसंबंधांविषयी पुष्कळच विचार आला आहे; आणि त्या-संबंधींची दृष्टि अधिक शुद्ध आणि स्पष्ट झाली आहे. ह्या गोष्टीची जाणीव अलीकडच्या लेखकांना झाली आहे हें गेल्या वर्षांत प्रकाशित झालेल्या 'लोक आणि लौकिक,' 'स्पर्शाची पालवी' ह्यांसारख्या संग्रहांकडे पाहिलें म्हणजे दिसून येतें. वाङ्मयाच्या सकस-पणाच्या दृष्टीने ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. ● ● ●

प्रा. शांताबाई ज० शेळके

## चरित्रें-आत्मचरित्रें

मराठी वाङ्मयाचा इतिहास पाहूं गेलें तर चरित्रें आणि आत्मचरित्रें या दोहोंचीहि तेथे कधीच वाण पडलेली नाही असें आपणांस दिसून येईल. इंग्रजांचें आगमन आपल्या देशांत झाल्यानंतर इंग्रजी साहित्याच्या परिशीलनाने चरित्र-आत्मचरित्र-लेखनाला मराठींत विशेष भर आला ही गोष्ट जरी खरी असली, तरी इंग्रजपूर्व साहित्यांतहि महानुभावपंथाचे संस्थापक श्रीचक्रधर यांच्या लीळाचरित्रापासून तों पेशवाईतले सुप्रसिद्ध मुत्सद्दी नाना फडणीस यांच्या स्पष्टोक्तिपूर्ण ( outspoken ) आत्मचरित्रापर्यंत अनेक चरित्र-आत्मचरित्राचे प्रयत्न या ना त्या मार्गाने झालेले आपणांस दिसून येतात. महिपतीच्या भावुक व भाबड्या संत-चरित्रांच्या जोडीलाच तुकारामासारख्या अध्यात्ममार्गावरच्या एखाद्या कडकडीत साधकाने आपल्या आत्मविकासाचा आपल्या अभंगांच्याद्वारा घेतलेला मागोवा येथे जसा आढळतो त्याप्रमाणेच विशिष्ट संतांच्या विशिष्ट आख्यायिका भक्तिभावाने जतन करून ठेवणाऱ्या मराठी जनतेच्या मनोवृत्तींतहि कांहीएक चमत्कारिक सुसंगति आपल्या प्रत्ययाला येते. तात्पर्य, चरित्रें किंवा आत्मचरित्रें ही कांही खास इंग्रजी वाङ्मयानेच आपणांला दिलेली देणगी नव्हे. तथापि, इंग्रजांच्या आगमनानंतर हे दोन्ही साहित्यप्रकार आपणांकडे खूपच विकसित झाले हीहि गोष्ट नाकबूल करतां यावयाची नाही. एखादे गांधीजी, एखादा रूसो, एखादा टॉल्स्टॉय किंवा एखादा डोस्टोव्हस्की जरी आमच्याकडे चरित्र-आत्मचरित्र लिहितांना दिसला नाही तरी मराठींत अनेक प्रसन्न, प्रक्षोभक, सुंदर तशींच उद्बोधकहि चरित्रें व आत्मचरित्रें पाहावयाला मिळतात. ‘ आमच्या आयुष्यांतील आठवणी ’, ‘ चरित्रचंद्र ’, ‘ स्मृतिचित्रें ’, ‘ गतगोष्टी ’, ‘ माधव ज्यूलियन ’—सहज आठवलेलीं हीं कांही नांवें पाहिलीं तरी या क्षेत्रांत मराठी माणसांनी गाजवलेली कर्तबगारी आपल्या ध्यानांत यावयास अडचण पडूं नये. मराठी माणसाचा अन्तर्मुख, संकोची, स्वत:विषयी कांही बोलावयास सहसा तयार नसणारा स्वभाव आणि मराठींत वैपुल्याने लिहिलीं जाणारीं चरित्रें-आत्मचरित्रें—विशेषतः आत्मचरित्रें—या दोहोंचा मेळ कसा घालवयाचा कोण जाणे ! कदाचित् प्रत्यक्ष बोलण्याची तयारी नसल्यामुळेच लिहिणें हें मराठी मनाला जास्त सोपें व सुकर वाटत असेल. कारण कांही का असेना, मराठी साहित्यांत चरित्रें व आत्मचरित्रें—दोन्हीहि भरपूर प्रमाणांत निर्माण होतांना दिसतात हें मात्र खरें.

एकोणीसशे अठ्ठावन्न हें सालहि या नियमाला अपवाद नाही. या वर्षी अनेक लहान-मोठ्या चरित्रांची व आत्मचरित्रांची भर मराठी साहित्यांत पडली आहे. निश्चित आंकडाच सांगावयाचा तर या उभय प्रकारांची मिळून संख्या चाळीसच्या आसपास जाते. या वर्षीच्या चरित्रांत व आत्मचरित्रांत जेवढें वैविध्य तेवढेंच वैचित्र्यहि आढळून येतें. हें वैविध्य आणि वैचित्र्य जसें भाषा, निवेदनशैली, आशय यांत दिसून येतें, तेवढेंच तें ग्रंथविषय असणाऱ्या व्यक्तींच्या व्यक्तिमत्त्वांतहि आढळून येतें. या वर्षीच्या चरित्रांमध्ये छत्रपति शिवाजीमहाराज, रामदास, झाशीची राणी, स्वा० सावरकर, महर्षि कर्वे, आचार्य अत्रे यांसारख्या खास महाराष्ट्रीय माणसांचीं चरित्रें जशीं लिहिलीं गेलीं आहेत त्याप्रमाणे लॉर्ड बेडन पॉवेल, एब लिंकन, रॉकफेलर, उपेन्द्रनाथ बंद्योपाध्याय, जमनालाल बजाज, लेनिन किंवा तेनसिंग नोर्के यांसारख्या अ-मराठी माणसांचीं चरित्रेंहि प्रसिद्ध झालीं आहेत. लक्ष्मणराव किर्लोस्कर किंवा केशव भिकाजी ढवळे यांच्यासारख्या विशिष्ट धंद्यांमध्ये ख्यातनाम झालेल्या व्यावसायिकांच्या चरित्र-लेखनाचे प्रयोग जसे या वर्षी झाले आहेत, त्याप्रमाणेच प्रा. रा. द. रानडे यांच्यासारख्या पारमार्थिक मार्गावरच्या प्रवाशाच्या चरित्राचा व तत्त्वज्ञानाचाहि वाचकांना परिचय करून देण्यांत आला आहे. महर्षि कर्वे, डॉ० आंबेडकर, आपटे गुरुजी किंवा विठ्ठल रामजी शिंदे

यांसारख्या थोर समाजसेवकांच्या त्यागमय व निष्ठावन्त जीवनाचें रहस्य उलगडण्याचा जसा कोणीं प्रयत्न केलेला दिसतो, त्याप्रमाणेच आचार्य अत्र्यांसारख्या महाराष्ट्राच्या विविध कार्य-क्षेत्रांत सारख्याच धडाडीने व समरसतेने रंगून जाणाऱ्या एखाद्या कलंदर कलावंताच्या जीव-नाचे विविध पैलूहि त्यांच्या निकटवर्तीयांनी दाखवून दिलेले पाहावयास मिळतात. ‘तुकाराम-महाराजांचे संतसांगाती’ सारखें एखादें पुस्तक खास चरित्र-वाङ्मयांत जरी बसूं शकलें नाही तरी त्यांतली संशोधनाची सूक्ष्मता व सत्यान्वेषणाची तळमळ आपल्या अंतःकरणाला जाऊन भिडते. ‘स्मृतिशेष’सारख्या ग्रंथांतून काकासाहेब गाडगिळांचें मिस्किल आणि खोडकर व्यक्ति-मत्त्व आपल्या परिचयाचें होतें, तर राधाबाई आपटे यांनी ‘ ढळला रे ढळला दिन सखया ’ या ग्रंथांतून आपले पति आपटे गुरुजी यांचें अत्यंत निरलंकृत भाषेंत आणि विलक्षण संयमपूर्ण रीतीनें रेखाटलेलें चित्र आवरून धरलेल्या हुंदक्याप्रमाणे उत्कट व हृदयस्पर्शी वाटतें. चरित्र कोणाचें लिहिलें जावें किंवा आत्मचरित्र कोणीं लिहावें याला तसा जरी कांहीं नियम नसला तरी देखील जीवनाच्या कोणत्या ना कोणत्या क्षेत्रांत ज्यांनी कांहीतरी कामगिरी बजावली आहे अशा यशस्वी किंवा अयशस्वी व्यक्तींचीं देखील चरित्रें लिहिलीं जातात, आणि आत्मचरित्र लिहिण्याचा मोह देखील अशाच व्यक्तींना होतो. चरित्रविषयीभूत किंवा आत्मचरित्र लिहिणाऱ्या व्यक्तीच्या जीवनाला जितके अधिक पैलू असतील, तितकें चरित्र-आत्मचरित्रांत तिचें पडलेले प्रतिबिंब अधिक मनोज्ञ वाटतें व या दृष्टीनेहि या वर्षी लिहिल्या गेलेल्या अनेक ग्रंथांचें मोल वाचकांना वाटेल यांत शंका नाही.

एकोणीसशे अट्ठावन्न सालीं लिहिलेल्या चरित्रग्रंथांतले अनेक ग्रंथ शाळकरी स्वरूपाचे आहेत. ‘ शाळकरी स्वरूपाचे ’ हे शब्द येथें अधिक्षेपाने वापरलेले नाहीत. ‘ विद्यार्थ्यांना उपयुक्त ’ असाच त्यांचा अर्थ घ्यावयाचा. बा. वा. फाटक यांचा ‘ धनंजय अर्जुन, ’ ग. म. वैद्य यांचा ‘ रामलीला, ’ गो. स. सरदेसाई यांचा ‘ राजा शिवाजी’, वि. वा. हडप यांचा ‘ रामदास ’, आचार्य अत्रे यांचा ‘ विनोबा ’ आणि पद्मावती असईकर यांचा ‘ सतर्षि ’ हे छोटे चरित्रग्रंथ या सदरांत पडतील. वि. स. गोखले यांचा ‘ मर्दानी झांसीवाली, ’ के. रा. जोशी यांचा ‘ सम्राट् श्रीहर्ष ’ आणि बाळ शंकर देशपांडे यांचा ‘ क्रांतिकारकांचे मुकुटमणि स्वा. सावरकर ’ हे ग्रंथहि याच सदरांत घालावयाला हवेत. विद्यार्थ्यांसाठी साध्या, सरळ व अत्यंत सुबोध शैलीने एखादें चरित्र कसें लिहावें याचा आदर्श आचार्य अत्रे यांनी लिहि-लेल्या ‘विनोबा’ या छोट्या पुस्तकांत पाहावयाला मिळतो. नमुन्यादाखल हा परिच्छेद पाहावा. “ भारतवर्ष तर बोलूनचालून साधुसंतांचीच भूमि. या भूमींत साधुसंतांच्या परंपरेला आज-पर्यंत कधीं खंड पडलेला नाही. आजहि भारतांत अनेक संत असतील. सर्वच आपणांस कोठून ठाऊक असणार ? पण या घटकेला सर्व भारताला माहीत असलेला एकच महान् संत म्हणजे विनोबा, यांत काय संशय ? गांधीजींनंतर भारताची प्रतिष्ठा आज त्यांनीच राखली आहे. आद्य शंकराचार्यांनंतर एवढा बुद्धिमान् आणि विचारी पुरुष या भारतांत झालेला नाहीं. किंबहुना श्री. शंकराचार्यांचा ते अवतार होत असें म्हणावयाला हरकत नाही. मानवतेच्या चिरंतन कल्याणाचा एक नवीन धर्मच स्थापन करण्याचें कार्य आज ते करीत आहेत. ” या उताऱ्यांतील साधी, सरळ व तरीहि डौलदार शैली ‘ विनोबा ’ या विषयाला साजेशीच नाही काय ? याउलट स्वातंत्र्यवीर सावरकरांचें चरित्र लिहितांना बाळ शंकर देशपांडे यांनी आपल्या लेखनाचा प्रारंभ अत्यंत क्षुद्र आणि वैरस्यकारक कोट्यांनी युक्त अशा अलं-कारिक शैलीने केला आहे. नमुन्यादाखल हीं वाक्यें बघावींत. “ आमच्या चाळींतील एक मद्रासी सुका कोळसा मिळत नाही म्हणून उठल्यासुटल्या सरकावर आग पाखडीत असतो.

माझ्या ओळखीचा एक वखारवाला जळाऊ लाकडाचे भाव नियंत्रित झाल्यानुळे मंत्र्यांना कुऱ्हाडी-च्या दांड्याची उपमा देत असतो; तर दुसऱ्या एका जमीनदार गृहस्थांना कूळकायद्यामुळे पायां-खालची जमीन घसरल्याप्रमाणे वाटून ते वैतागानं ' सरकारला लोकांच हित काय कळतंय् माती !' असं ज्याच्यात्याच्याजवळ म्हणत असतात ! " स्वातंत्र्यप्राप्तीनंतर क्षुल्लक गोष्टींबद्दल कुरकुरत राहणाऱ्या जनतेला उद्देशून हा परिच्छेद लेखकान लिहिला आहे. पण त्यांतून अवश्य तो उपरोध व्यक्त होण्याऐवजी विशिष्ट कोट्या साधण्याच्या लेखकाच्या अट्टाहासापायी तो हास्यास्पद मात्र ठरला आहे. स्वा. सावरकरांसारख्या उग्रप्रकृति, देदीप्यमान आणि व्यक्तिमत्त्वाच्या अशा क्रांतिकारकावर लिहितांना देखील लेखकाला यापेक्षा जास्त गंभीर आणि भावपूर्ण असा प्रारंभ सुचू नये हें उद्वेगजनक नव्हे काय ? चरित्राची लेखनशैली कशी असावी हें ज्या त्या लेखकावर अवलंबून असलें तरी लेखनाचा विषय असलेली व्यक्ति आणि तिच्या चरित्राची शैली यांत कांहीतरी सुसंगति वाचक अपेक्षितो यांत शंका नाहीं. दुसरीहि एक गोष्ट याच संदर्भात सुचते व तीहि नमूद केल्यावाचून राहवत नाही. देशपांड्यांच्या याच पुस्तकांत पुढेहि जिकडेतिकडे अत्यंत भडक अशा अलंकारिक शैलीचा वापर केलेला दिसतो. या अशा शैलीमुळे खुद्द सावरकरांच्या व्यक्तिमत्त्वावर कांही प्रकाश पडण्याऐवजी देशपांड्यांकडेच वाचकाचें लक्ष अधिक वेधलें जाण्याचा संभव आहे; आणि असें होणें चरित्राच्या यशस्वितेच्या दृष्टीने कितपत योग्य ठरतें हा प्रश्न हें पुस्तक वाचतांना मनांत आल्याखेरीज राहत नाही.

या अशा चरित्रानंतर खैरमोडे यांनी लिहिलेल्या डॉ. आंबेडकरांच्या चरित्राचा दुसरा खंड, शंकरराव किर्लोस्कर यांनी लिहिलेलें लक्ष्मणराव किर्लोस्करांचें ' यांत्रिकाची यात्रा ' हें चरित्र किंवा ' ढळला रे ढळला दिन सखया ' हें राधाबाई आपटे यांनी रेखाटलेलें आपटे गुरुजींचें शब्दचित्र यांकडे आपण वळलों की या तिन्ही ग्रंथांतील साध्या, अकृत्रिम व तरीहि अत्यंत जिव्हाळ्याच्या अशा शैलीचा गोडवा आपणाला अधिकच जाणवल्याखेरीज राहत नाही. खैरमोडे, शंकरराव किर्लोस्कर किंवा राधाबाई आपटे ही तिन्हीहि मंडळी कांही रूढ अर्थाने ललित लेखक म्हणतां यावयाची नाहीत; आणि तरीहि त्यांनी लिहिलेले हे ग्रंथ विलक्षण रसाळ व चित्तवेधक उतरले आहेत. डॉ. आंबेडकर, लक्ष्मणराव किर्लोस्कर किंवा आपटे गुरुजी यांचें व्यक्तिमत्त्वच वैविध्यपूर्ण व चित्ताकर्षक होतें हें प्रस्तुत ग्रंथ रोचक होण्याचें एक कारण आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. पण चरित्रलेखकांना त्या त्या व्यक्तीविषयी वाटणारा जिव्हाळा व त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें यथार्थ दर्शन वाचकांना घडवून द्यावयाची त्यांच्या मनाला लागलेली तळमळ हें देखील त्या ग्रंथांच्या यशस्वितेचें एक कारण नाही काय ? भक्ति, जिव्हाळा, प्रेम या गोष्टींमुळे या तिन्ही ग्रंथांत लेखकांच्या लेखणीला आपोआपच वाङ्मयीन शैली प्राप्त झालेली दिसून येते. डॉ. आंबेडकरांचें वर्णन करतांना त्यांनी लिहिलेला हा परिच्छेद या दृष्टीने मुद्दाम बघण्याजोगा आहे.

" पुस्तकांचे स्टँड्स्, टेबलें, कपाटें इत्यादि जड सामान हलविण्यांत ते स्वतः हातभार लावीत असत. या श्रमामुळे त्यांचा चेहरा व हातांचे तळवे लालबुंद होत असत. बाळसेदार मुलाचीं हाताचीं बोटें जशीं सुबक व मोहक असतात तशीं साहेबांच्या हातांचीं बोटें असत. अतिश्रमामुळे तीं बोटें कोमेजलेल्या फुलांप्रमाणे मलूल दिसत असत. डोकीवरच्या केसांची फार काळजी घेत. केस चापूनचोपून बसल्यानंतर कोणाशीं गप्पा मारतांना आपल्या केसां-वरून उजवा हात फिरवीत असत ... पण अंगमेहनतीच्या वेळीं अगर विमनस्क अवस्थेंत ते केसांना स्वैर सोडून देत असत. त्यांचे केस लांब व कुरळे होते. ते विमुक्तावस्थेंत वाऱ्याबरोबर स्वच्छंदाने नाचत असत. अशा अवस्थेंतहि साहेबांचा चेहरा मोहक वाटे. "

अनुक्रमणिका

साधेपणाचें व अकृत्रिमतेचें हेंच सौंदर्य शंकरराव किर्लोस्कर यांनी लिहिलेल्या ' यांत्रिकाची यात्रा ' या लक्ष्मणराव किर्लोस्कर यांच्या चरित्रांत उतरलें आहे. महाराष्ट्रांत उद्योगपति आधीच कमी. त्यांतूनहि केवळ स्वतःच्या कर्तबगारीवर आणि अंगबळावर पुढे एका भल्याथोरल्या कारखान्यांच्या समुदायांचा संचालक व मालक बनलेला लक्ष्मणरावांसारखा उद्योगपति तर येथे विरळाच. त्या दृष्टीने त्यांचें संपूर्ण चरित्र लिहिलें जाणें महाराष्ट्राच्या तरुण पिढीसाठी केवळ इष्टच नव्हे तर अत्यंत आवश्यकहि होतें. ती कामगिरी शंकरराव किर्लोस्कर यांनी पार पाडली ही गोष्ट फार चांगली झाली. शंकरराव यांच्या मनांत लक्ष्मणरावांसंबंधी नितान्त प्रेम व आदर आहे. पण या प्रेमामुळे किंवा आदरामुळे लक्ष्मणरावांच्या अंगीं कोणतेहि अतिमानवी गुण चिकटविण्याचा त्यांनी कोठे प्रयत्न केलेला नाही. प्रेमाने व भक्तीने ओथंबलेलें पण तरीहि चरित्रनायकासंबंधी संयम, पूर्ण अलिप्त आणि केवळ वस्तुनिष्ठ दृष्टिकोन ठेवून लिहिलेलें हें चरित्र अथपासून इतिपर्यंत अत्यंत चित्तवेधक उतरलें आहे.

राधाबाई आपटे यांनी आपल्या पतीचें असेंच हृदयंगम चित्र ' ढळला रे ढळला दिन सखया ' या पुस्तकांत रेखाटलें आहे. पत्नीने पतीवर लिहावयाचें ही प्रथा आपल्याकडे फार जुनी आहे, व अशीं चरित्रें सुंदर उतरावयाचीं हाहि जणू एक नियमच ठरून गेला आहे. रमाबाई रानडे यांचें चरित्र, लक्ष्मीबाई टिळक यांनी काढलेलीं रे० टिळकांच्या जीवनाचीं हृदयंगम चित्रें, कांही वर्षांपूर्वी लीलाबाई पटवर्धन यांनी आपले पति कवि माधव ज्यूलियन यांच्या सहवासांत घालविलेल्या अकरा वर्षांचा काढलेला आलेख हीं पुस्तकें सुप्रसिद्ध आहेत. राधाबाई आपटे यांचें हें पुस्तकहि वरील पुस्तकांच्या पंक्तींत निःसंशय जाऊन बसण्याजोगें आहे. या पुस्तकाचा सर्वांत मोठा गुण म्हणजे त्याचा संयम. कोठेहि भडकपणा, आकस्ताळेपणा किंवा अतिरेक न करतां अतिशय संयमानें, सूचकतेनें हें पुस्तक लेखिकेने लिहिलें आहे. सूर्याचा कवडसा काचेवरून परावर्तित व्हावा त्याप्रमाणे लेखिकेच्या लेखांतून तिच्या पतीचें प्रतीत होणारें हें व्यक्तिमत्त्व जितकें आल्हाददायक तितकेंच हृदयस्पर्शी वठलें आहे.

या वर्षी लिहिल्या गेलेल्या चरित्रांतलीं विशेष उल्लेखनीय चरित्रें म्हणजे खैरमोडे यांनी लिहिलेला डॉ. आंबेडकर यांच्या चरित्राचा द्वितीय खंड, शं. गो. तुळपुळे यांनी लिहिलेला ' प्रा. वा. द. रानडे, चरित्र आणि तत्त्वज्ञान ' हा ग्रंथ आणि वा. की. बेंद्रे यांचा तुकाराममहाराजांचे संतसांगाती हा ग्रंथ. डॉ. आंबेडकर हा महाराष्ट्राच्या आधुनिक जीवनांतला एक अद्‌भुत चमत्कार आहे आणि त्यांची जीवनकथा ही केवळ एका व्यक्तीची जीवनकथा नसून एका समग्र दलितवर्गाच्या उत्थानाची ती कहाणी आहे. या दृष्टीने डॉ. आंबेडकरांचें संपूर्ण चरित्र लिहिलें जाणें अत्यंत आवश्यक होतें. ही गरज खैरमोडे यांच्यासारख्या डॉक्टरांच्या एका सुजाण व बुद्धिमान् निकटवर्तीयाने हातीं घेतली हें फार चांगलें झालें. हें चरित्र लेखकाने किती परिश्रमपूर्वक लिहिलें आहे त्याची साक्ष पहिले दोन खंड पाहून पटल्याखेरीज राहत नाही. पुढच्या खंडांबद्दल औत्सुक्य वाटावें इतके हे दोन्ही खंड चित्ताकर्षक उतरले आहेत.

' प्रा. रा. द. रानडे, चरित्र आणि तत्त्वज्ञान ' हा शं. गो. तुळपुळे यांनी लिहिलेला ग्रंथ वैशिष्ट्यपूर्ण आहे. प्रा. रानडे या व्यक्तीभोवती अद्‌भुतरम्यतेचें एक वलय आहे. आधुनिक काळांत, आंग्लविद्याविभूषित असूनहि, प्राचीन काळच्या ऋषींप्रमाणे आत्मानात्मविचारांत रंगून जाणारा आणि तरीहि भंपकपणाचा किंवा दंभाचा आक्षेप स्वतःवर दूरतःहि न येऊं देणारा असा प्रा. रानडे हा चालू युगांतला एक महान् संतच म्हटला पाहिजे. रानड्यांचें तत्त्वज्ञान कोणाला पटण्याजोगें असो वा नसो, या श्रेष्ठ साधकाच्या जीविताचें मर्म काय होतें व आपली साधना त्याने कोणत्या मार्गांनी केली याबद्दल सर्वसामान्य वाचकाला कुतूहल असणें

स्वाभाविक आहे. या कुतूहलाचा थोडा तरी उपशम प्रस्तुत ग्रंथाच्या वाचनाने होईल याबद्दल मला संशय वाटत नाही. या पुस्तकाचें आणखी एक उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे त्यांची सरळ व सोपी भाषाशैली. तत्त्वज्ञानाची चिकित्सा जडजंबाळ भाषेंतच केली जाते असा ज्या कोणाचा समज असेल त्याने हें पुस्तक एकदा अवश्य डोळ्यांखालून घातलें पाहिजे.

'तुकाराममहाराजांचे संतसांगाती' या वेंद्रे यांच्या ग्रंथाचें स्वरूप कांहीसें निराळें आहे. प्रस्तुत ग्रंथ लिहिण्यामागची आपली भूमिका स्पष्ट करतांना लेखक म्हणतो, "संतांची शिकवण फार मोठी आहे. त्यांचें वाङ्मय श्रेष्ठ दर्जाचें आहे. त्यांच्या तत्त्वज्ञानांत कितीतरी प्रगतिपर सामाजिक व पारमार्थिक क्रांतीचें उद्‌बोधन केलेलें आहे. हें सर्व ज्ञान नीट समजून घेणें असेल, ही अमोल राष्ट्रीय संपत्ति वाया दवडावयाची नसेल तर या संतांच्या चरित्रांचें ऐतिहासिक दृष्ट्या परीक्षण करून तत्कालीन वस्तुस्थितीचा व त्यांच्या चरित्रांतील वास्तवतेचा बोध करून घेणें आवश्यक आहे. यापुढे झालें तसें दुर्लक्ष करून चालणार नाही. हा बुरसटलेला वाङ्मयीन ठेवा शुद्ध व स्वच्छ राखण्याचा प्रयत्न न झाला तर तो पुढील चिकित्सक युगांत रुचिबाह्य झाल्याने फुकट जाईल."

या ग्रंथांत खुद्द तुकाराममहाराजांबद्दल अनुषंगाने जी कांही माहिती आली असेल तेवढीच. विशेष भर रामेश्वर वाघोलीकर, मंबाजीबोवा, शेख महंमद बाबा, चिंतामणी देव चिंचवडकर, कचेश्वर भट ब्रह्मे, लोहगांवकर मंडळी इत्यादि 'सांगत्यां'वरच आहे. या मंडळींशीं ज्या कांही दंतकथा निगडित झाल्या आहेत व ज्या परंपरेने चालत आल्या आहेत त्या दंतकथा खोट्या व निराधार आहेत हें लेखकाने येथे पुराव्यानिशी सिद्ध केलें आहे. या दंतकथांनी तुकारामासारख्या महान् भगवद्‌भक्ताभोवती दैवी चमत्कारांचें वलय तयार होतें व त्याचें वास्तवरूप आपल्याला दिसतच नाही. लेखकाच्या मार्मिक शब्दांतच सांगावयाचें झालें तर "जशी मारुतीची अगर गणपतीची मूर्ति शेंदूर-विलेपनाने रूपातीत होते तशांतलाच हा प्रकार झाला आहे. अर्थात् ज्ञानदृष्टीस भ्रम उत्पन्न करणारीं हीं सारीं पटलें दूर केल्याखेरीज तुकोबांचें दर्शन होणें कठीण आहे." हें काम या पुस्तकांत लेखकाने फारच चांगल्या रीतीने पार पाडलें आहे असेंच हा ग्रंथ वाचून कोणीहि म्हणेल.

शिवाजीमहाराजांच्या जीवनावर या वर्षी तीन पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत. 'राजा शिवछत्रपति' हें पुस्तक ब. मो. पुरंदरे यांनी लिहिलें आहे. 'राजा शिवाजी' हें पुस्तक सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक गो. स. सरदेसाई यांनी लिहिलें आहे, आणि 'छत्रपति शिवाजी' हा बाळशास्त्री हरदास यांनी लिहावयाला घेतलेल्या शिवचरित्राचा पूर्वार्ध आहे. यांपैकी सरदेसायांचें पुस्तक निर्दोष ऐतिहासिक दृष्टिकोनाचा नमुना म्हणून व बाळशास्त्र्यांचें पुस्तक त्यांतल्या काव्यमय शैलीसाठी, अवश्य वाचनीय आहेत. शिवाजीमहाराजांप्रमाणे झाशीच्या राणीवरहि या वर्षी दोन पुस्तकें लिहिलीं गेलीं आहेत. पैकीं 'मर्दानी झाशीवाली' हें वि. स. गोखले यांचें पुस्तक शालोपयोगी पुस्तकासारखें वाटतें, तर 'स्वातंत्र्यदेवता झाशीची महाराणी लक्ष्मीबाई' हा ग्रंथ तांबे घराण्यांतल्याच एका महिलेने लिहिला आहे हें त्याचें वैशिष्ट्य होय. 'तांबेकुल वीरश्री' असलेल्या लक्ष्मीबाईचें चरित्र लिहावयाला सुमन तांबे यांच्यासारखी त्याच घराण्यांतली महिला लाभावी हा योगायोग उल्लेखनीय आहे. शिवाजीमहाराज, झाशीची राणी यांच्यावर पुनःपुन्हा पुस्तकें लिहिलीं जातात, त्यांना प्रकाशक लाभतात आणि वाचकहि मिळतात, ही गोष्ट मोठ्या आनंदाची व अभिमानाची आहे. महाराष्ट्र आपलीं पूजास्थानें विसरलेला नाही याचेंच हें निदर्शक नव्हे काय?

अण्णासाहेब कर्वे यांनी नुकतीच आपल्या वयाची शंभरी पूर्ण केली. या निमित्ताने या

अनुक्रमणिका

ऋषितुल्य समाजसेवकावर सर्वांनी शब्दसुमनांची अंजलि वाहिली. या वर्षीहि 'भाग्यवान् शतायुषी' हें कर्व्यांच्यावरचें पुस्तक य. गो. नित्सुरे यांनीं लिहिलें आहे. पण या पुस्तकापेक्षाहि हिंगण्याच्या संस्थेने 'धोंडो केशव कर्वे : आत्मवृत्त व चरित्र' हा जो ग्रंथ प्रसिद्ध केला आहे त्याचा येथे विशेष उल्लेख करावासा वाटतो. कर्व्यांनी आपलें आत्मचरित्र मागेच लिहिलेलें आहे. त्याचें हें पुनर्मुद्रण आहे. ज्या निष्ठेने, ज्या एकमार्गीपणाने आणि ज्या कडव्या वृत्तीने अण्णासाहेब कर्व्यांनी आपलें अंगीकृत कार्य सतत चिकाटीने केलें, त्या निष्ठेचा, एकमार्गीपणाचा व कडव्या वृत्तीचा प्रत्यय या ग्रंथांत पुरेपूर भरलेला आढळून येतो. एका समाजसेवकाचें आत्मवृत्त या दृष्टीने तर या ग्रंथाला महत्त्व आहेच, पण कोकणची माणसें साधेपणा, काटकपणा, काटकसर वगैरे ज्या गुणांबद्दल प्रसिद्ध आहेत त्या गुणांनी या पुस्तकांतली भाषाशैली अगदी पुरेपूर भरलेली आहे हीहि एक उल्लेखनीय गोष्ट आहे. इतकी साधी, तुटक, कडकडीत पण तरीहि जिव्हाळ्याने भरलेली शैली अन्यत्र क्वचितच आढळेल.

या वर्षीच्या आणखी कांही उल्लेखनीय चरित्रांचा निर्देश करून हा लेख आता संपवीत आहे. हीं उल्लेखनीय चरित्रें 'केशव भिकाजी ढवळे' व 'आचार्य अत्रे : विविधदर्शन' हीं होत. केशव भिकाजी ढवळे आणि प्रकाशन संस्था या दोन गोष्टी परस्परांशीं इतक्या कांही निगडित होऊन गेल्या आहेत की, या महाराष्ट्रांत तरी एकीचा उल्लेख केल्यानंतर दुसरीचें स्मरण होणें केवळ अपरिहार्यच आहे. 'केशव भिकाजी ढवळे' या ग्रंथांत ढवळे यांच्या प्रथम वर्षश्राद्धाच्या दिवशीं त्यांच्या अनेक मित्रमंडळींनी, सहकाऱ्यांनी व त्यांनी स्वत: प्रसिद्धि दिलेल्या लेखकांनी त्यांना वाहिलेल्या श्रद्धांजलींचें संकलन करण्यांत आलें आहे. या वेगवेगळ्या लेखांतून ढवळ्यांचें जें व्यक्तिमत्त्व साकार होतें तें मोठें प्रसन्न, सात्त्विक आणि सोज्ज्वळ असें वाटतें. प्रकाशनासारखा व्यवसाय करीत असतांना व्यावहारिक प्रगति आणि लौकिक प्रतिष्ठा या दोन्ही गोष्टी एकदम साधतीलच असें नाही. तें साधणाऱ्या या प्रकाशकश्रेष्ठाबद्दल मनाला आदर वाटल्याखेरीज राहत नाही.

'आचार्य अत्रे : विविधदर्शन' हा ग्रंथ अत्र्यांच्या साठीच्या निमित्ताने प्रकाशित करण्यांत आला आहे. शिक्षण, नाट्य, चित्र, वृत्तपत्रव्यवसाय, समाजकारण, राजकारण इत्यादि विविध क्षेत्रांत अत्र्यांनी आजपर्यंत अत्यंत उल्लेखनीय कामगिरी बजावली आहे. अत्रे ही एक व्यक्ति नसून ती एक संस्थाच म्हटली पाहिजे. या 'संस्थे'ने आतापर्यंत अनेक मित्र, सहकारी, हितचिंतक गोळा केले. या सर्व मंडळींनी वेगवेगळ्या प्रसंगीं अत्र्यांचें आपणाला जें दर्शन झालें त्याचें चित्र वेगवेगळ्या लेखांतून येथे काढलें आहे. अत्रे यांच्या बहुरंगी, तुफानी, कार्यव्यापृत आणि तरीहि हास्यरसाने तुडुंब भरून वाहणाऱ्या अशा जीवनाचें येथे मोठें विलोभनीय प्रत्यंतर येतें. या ग्रंथांतला पु. ल. देशपांडे यांचा लेख सर्वोत्कृष्ट वठला आहे असें म्हटल्यास त्यांत इतरांना वैषम्य वाटूं नये. खुद्द अत्रे यांचा प्रस्तुत ग्रंथांतला लेख त्यांच्या उत्कृष्ट लेखांपैकी एक म्हटला पाहिजे. त्यांच्या निर्मळ, निकोप आणि प्रसन्न शैलीचा हा एक अत्यंत सुंदर नमुना आहे.

गतवर्षीं जीं चरित्रें व आत्मचरित्रें मराठींत प्रसिद्ध झालीं त्यांचा हा एक ओझरता आढावा आहे. सर्वच ग्रंथांचा येथें परामर्श घेतां आलेला नाही व कांहींचा तर कदाचित् उल्लेखहि करावयाचा राहून गेला असेल. पण याच्या पाठीमागे कोणाविषयींची उपेक्षाबुद्धि हें कारण नसून, वेळेचा अपुरेपणा व ग्रंथांची अनुपस्थिति हींच कारणें होतीं. अर्थात् कोणावर कांही अन्याय कळत नकळत झाला असल्यास, त्यांची मन:पूर्वक क्षमा मागण्यापलीकडे लेखिका दुसरें काय करूं शकणार ! ● ● ●

# ग्रंथसूचि (१९५८)

( पुस्तकाचें नांव, लेखकाचें नांव, प्रकाशकाचें नांव व पत्ता, पृष्ठसंख्या व मूल्य.)

[ तयार करणार—म. श्री. दीक्षित ].

## कथा

१. **चित्रकथा** ( खंड १ ला )—प्र. के. अत्रे, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ३३४, ७ = ५०.
२. **कोंकणी ग वस्ती** ऽ ऽ—म. मं. कर्णिक, मनोहर ग्रंथमाला, टिळक रोड, पुणें २; १३९, २ = ५०.
३. **चंदनाची वीणा**—माधव कानिटकर, कुलकर्णी ग्रंथागार, १८६ शनिवार, पुणें २; १२७, ३ रु.
४. **वेगळें जग**—गंगाधर गाडगीळ, कॉन्टिनेंटल प्रकाशन, टिळक रोड, पुणें २; १४३, ३ रु.
५. **कथांजली** ( बंगाली कथा )—अनुवादक, श्रीकांत गोगटे, अनुवाद प्रकाशन, मुंबई १, ११०, २ रु.
६. **चौथे चिमणराव**—चिं. वि. जोशी, चंद्रकांत शेट्ये, शिवकृपा, कोल्हापूर ३; १६२, ३ रु.
७. **मीलाद शरीफ आणि इतर कथा**—अनुवादक, रा. भि. जोशी, व्हीनस प्रकाशन, ४१० शनिवार, पुणें २; १६७, ३ = २५.
८. **गडे एकांताचा वास**—पद्माकर डावरे, श्री. लेखन वाचन भांडार, लक्ष्मी रोड, पुणें २; १६५ ३ = ५०.
९. **बुढीचं खाटलं**—मनोहर तल्हार, रीता प्रकाशन, अमरावती; ८५, २ रु.
१०. **निम्मी**—प्रभाकर तामणे, लाखाणी बुकडेपो, चर्नीरोड, मुंबई ४, १५५, ३ रु.
११. **कांच-पात्रें**—विजय तेंडूलकर, वसंतकुमार सराफ, प्रॉक्टर रोड, मुंबई ४, १४४, ३ रु.
१२. **आकाशाला आलं फूल**—गो. नी. दांडेकर, सिद्धार्थ साहित्य, बनाम हॉल लेन, मुंबई ४, १३६, २=५०.
१३. **दीपमाळ**—कुसुमावती देशपांडे, देशमुख आणि कं; ७३९ बुधवार, पुणें २; २१८, ५रु.
१४. **मधुमती**—रणजित देसाई, चंद्रकांत शेट्ये, शिवकृपा, कोल्हापूर ३; १४४, ३ रु.
१५. **जन्म**—गो. रा. दोडके, जीवन प्रकाशन, नागपूर; ९६, १=७५.
१६. **भरती**—ज्ञानेश्वर नाडकर्णी, मनीषा प्रकाशन, अमर भुवन, फ्रेंच ब्रिज, मुंबई ७; १५६, ३=५०.
१७. **चेहरा**—वसुंधरा पटवर्धन, वसंतकुमार सराफ, मुंबई ४; १४८, ३ रु.
१८. **वळीव**—शंकर पाटील, मौज प्रकाशन, खटाववाडी, मुंबई ४; १६३, ४=५०.
१९. **तीन उणे दोन=शून्य**—सौ. कमला फडके, कुलकर्णी ग्रंथागार, १८६ शनिवार, पुणें २; १२८, ३ रु.
२०. **अत्तर गुलाब**—ना. सी. फडके, + सौ. कमला फडके, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; १४८, ३ रु.

अनुक्रमणिका

२१. **आवळ्या भोपळ्याची मोट**–दत्त बांदेकर, शेठ भगवानजी हिरजी चाळ, मुंबई ४, १५८, ३=५०.
२२. **आणखी एकाची भर**–वि. आ. बुवा, जे. विनायक प्रकाशन,मुंबई २८;१५८, ३रु.
२३. **सौ० च्या पादुका**–वि. वि. बोकील, मनोरंजन प्रकाशन, ग्रँट रोड, मुंबई ७; १२३, २=५०.
२४. **माडगीळांचा कथा**–(संपादक) श्री. पु. भागवत, कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २; १६०, ३ रु.
२५. **कुभांड**–पु. भा. भावे, कॉंटिनेंटल बुक सर्व्हिस, अप्पा बळवंत चौक, पुणें २; १३१, ३ रु.
२६. **नौका**–पु. भा. भावे, वीणा प्रकाशन, नागपूर; १५९, ३=२५.
२७. **भुताचा जन्म आणि इतर कथा**–द. मा. मिरासदार, कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २; १४७, ३ रु.
२८. **देवालय**–आनंद रेगे, मनोहर ग्रंथालय, टिळक रोड, पुणें २; १३४, २=५०.
२९. **कामसेना**–डॉ. अ. वा. वर्टी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; १६७,३रु.
३०. **छळ आणि इतर कथा**–शान्ताराम, कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रोड, पुणें २; १३६, ३ रु.
३१. **तृणपुष्पें**–सौ० आनंदीबाई शिर्के, मनोहर ग्रंथमाला, टिळक रोड, पुणें २; १४८, २=५०.
३२. **सतारीचे बोल व इतर कथा**–वि. वा. शिरवाडकर, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; १५५, ३ रु.
३३. **चांदण्यांतील गप्पा**–बजरंग शेलार, ज. स. निकम, उरुल (उ. सातारा) ५८, १ रु.
३४. **प्रेमपत्र व इतर कथा**–सौ. यमुना शेवडे, नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर; १३२, २–७५.
३५. **बीजेची कोर**–सुमति क्षेत्रमाडे, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; १२७, २=५०.
३६. **प्राजक्ताचें फूल**–सौ. नलिनी सुखठणकर, बा. ग. ढवळे, कर्नाटक हाऊस, मुंबई २; ९२, २ रु.
३७. **माणसाचं मन**–अंबुजा सोनटक्के, सौ. उषा कुलकर्णी, सदभिरुची प्रकाशन, ७७३ सदाशिव, पुणें २; ११४, २=५०.

## कादंबरी

१. **लालन बैरागीण**-शिरीष अत्रे, चंद्रकांत शेट्ये, शिवकृपा, कोल्हापूर ३; १२४, २=५०.
२. **अभिमान**–चंद्रकांत काकोडकर, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; १८०, ५ रु.
३. **तेथे कर माझे जुळती**–चंद्रकांत काकोडकर, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, महाराजा बिल्डिंग, गिरगांव–मुंबई ४; २३४, ६ रु.
४. **प्रवरा**–चिं. वि. जोशी, पॅरमाऊंट पब्लि. सि. प्रा. लि. ४८१ शनिवार, पुणें २, १६५, २ रु.
५. **सुपारी**–य. गो. जोशी, यशवंत प्रकाशन, ६८९।२३ सदाशिव, पुणें २; १७२, ३रु.

६. **पानिपतची मोहीम** ( संक्षिप्त आवृत्ति ) – कै. ना. वि. बापट, संक्षेपक – पां. रा. ढमढेरे, कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रोड, पुणें २; ११६, १=५०.
७. **माचीवरला बुधा**–गो. नी. दांडेकर, महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; ११७, ३ रु.
८. **पड रे पाण्या**–र. वा. दिघे, ठोकळ प्रकाशन, लक्ष्मी रोड, पुणें २; ४९२, ८ रु.
९. **कोंडी**–ज्ञानेश्वर नाडकर्णी, वसंतकुमार सराफ, नवलेखन, प्रॉक्टर रोड, मुंबई ४; ९६, २ रु.
१०. **तपोवनांतील दुर्वा**–प्रफुल्लदत्त, अभिनव प्रकाशन, जेरबाई वाडिया रोड, परळ–मुंबई १२, ९०, १=५०.
११. **आणि इथें गोष्ट संपली**–सरोजिनी बाबर, कुलकर्णी ग्रंथागार, १८६ शनिवार, पुणें २; १३०; ३ रु.
१२. **वर्षाव**–पु. भा. भावे, देशमुख आणि कंपनी, कसबा, पुणें २; १९६, ५ रु.
१३. **स्थळयात्रा**–दि. बा. मोकाशी, इनामदार बंधु, ९९१ सदाशिव, पुणें २; ८४, १=५०.
१४. **तांबडा दगड**–ना. रा. शेंडे, नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर; १५४, ३ रु.
१५. **कृष्णा**–नु. ता. सावन्त, दुर्गा प्रकाशन; ११०, २=५०.
१६. **धर्मशाळा**–स. ना. सूर्यवंशी, ढवळे पॉप्युलर प्रकाशन, लॅमिंग्टन रोड, मुंबई ७; १००, १ रु.
१७. **जिद्द**–क. दि. सोनटक्के, वसंतकुमार सराफ, ई ५, मॉडेल हाऊस, प्रॉक्टर रोड, मुंबई ४; ११९, २=५०.

## काव्य

१. **कलश**–अमरशेख, कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २; १५२, ३ रु.
२. **नभ अंकुरलें**–तुळशीराम काजे, धारा प्रकाशन, रुक्मिणी नगर, अमरावती; ४८; २ रु.
३. **परिजात**–मा. गो. काटकर, चेतना प्रकाशन, पंढरपूर; २७, १ रु.
४. **रवींद्रमनन**–भाषांतरकार, काका कालेलकर, पॉप्युलर बुक डेपो, लॅमिंग्टन रोड, मुंबई ७; २००, ४ रु.
५. **चंद्राचा हट्ट**–श्रीनिवास खारकर, सौ. उषा जयराम नागपूरकर, ३४१ सदाशिव, पुणें २; १००, २=५०.
६. **हरिवरदा**–( खंड ४ था, अध्याय २९ ते ३७ ) – संपादक, रा. चिं. ढेरे, द. र. कोपर्डेकर, ५२९ सदाशिव, पुणें २; १८५, ६ रु.
७. **योगवशिष्ठ** ( भाग १, प्रकरणें १ ते ५ )–माधवस्वामी, संपा.–शं. गो. तुळपुळे, राजिस्ट्रार, पुणें विद्यापीठ, पुणें ७; २४७, ७ रु०.
८. **निवांत**–काशीताई नाटेकर, लेखन वाचन भांडार, लक्ष्मीरोड, पुणें २; ४८, १=५०.
९. **मराठीची माया** ( मराठवाड्यांतील स्त्रीगीतसंग्रह )–संग्रा, ना. गो. नांदापूरकर, ना. गो. नांदापूरकर, इमलीबन, कुतबीगुडा, हैद्राबाद; १३१, १=५०.
१०. **कुसुम करंडक** ( भाषांतरित कविता )–म. श्री. पंडित, चित्रशाळा प्रेस, १०२६ सदाशिव, पुणें २; ७२, १=२५.

११. **वसुन्धरा**–प्रताप, चित्रशाळा प्रेस, पुणे २; ९६, २ रु०.
१२. **पल्लवी** ( रत्नागिरी जिल्हा–नवोदित संकलित कविता )–संपा; आरती प्रभु, सी. श्री. उपाध्ये, चिं. त्र्यं. खानोलकर, कुडाळ ( रत्नागिरी ); ५५, १=५०.
१३. **बुलबुल**–श्रीकृष्ण पोवळे, महाराष्ट्र ग्रंथभांडार, गिरगांव, मुंबई ४; ९२, ३ रु०.
१४. **धुवाधार**–बाबुलनाथ; कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणे २; १५२, ३=५०.
१५. **वसुधा**–अ. श्री. भवाळकर, सौ. प्रतिभा भवाळकर, १३ सदाशिव स्ट्रीट, गिरगांव–मुंबई ४; ६३, २=५०.
१६. **पाणपोई**–( इंग्रजी काव्यसूक्तींची ) खंड २ रा. ल. गो. विंझे, प्रसाद प्रकाशन, सदाशिव, पुणे २; ४३८, ७=५०.
१७. **मेघदूत**–भाषांतर, रा. प. सबनीस, कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणे २; ८४, १=५०.
१८. **जलवंती**–सुधांशु, कुलकर्णी ग्रंथागार, १८६ शनिवार, पुणे २; ८४, २ रु०.
१९. **श्री. नामदेवरायांची सार्थ गाथा** ( भाग ४ था )–संग्राहक, प्र. सी. सुबंध, प्र. शि. सुबंध, ११६३ म० गांधी रोड, पुणे १; ४१८, ६ रु०.

## नाटक एकांकिका

१. **देवांचं मनोराज्य**–वसंत कानेटकर, पाप्युलर बुकडेपो, लॅमिंग्टन – रोड, मुंबई ७; १०७, ३ रु०.
२. **धिनगजाची खिडकी**–बाळ कुडतरकर, मॅजिस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ६६, १=५०.
३. **जंगलमें मंगल**–न. चिं. केळकर, का. न. केळकर, के. वा. जोशी, २५ बुधवार; पुणे २; ६४, १=५०.
४. **आकाशगंगा**–बाळ कोल्हटकर, ग. पां. परचुरे प्रकाशनमंदिर, मुंबई ४, १०८, २=५०.
५. **कवि अनंतफंदी**–नानासाहेब गोखले, जयराम शिलेदार, जितेकर चाळ, ठाकूरद्वार, मुंबई २; ७२, १=५०.
६. **उद्यापन**–कृ. भा. जोशी, सौ. इंदुमती जोशी, २७, रेल्वे क्वार्टर्स, नाशिकरोड; ७४, २ रु०.
७. **नांवाचे मोठे**–गो. रा. जोशी, के. वा. जोशी, २५ बुधवार, पुणे २; ८४, २ रु०.
८. **मधल्या भिंती**–विजय तेंडूलकर, रामकृष्ण बुक डेपो, गिरगांव, मुंबई ४; १०१, २ रु.
९. **शितू**–गो. नी. दांडेकर, महाराष्ट्र प्रकाशन, राजकमल चौक, अमरावती, ६८; २रु०.
१०. **सुंदर मी होणार**–पु. ल. देशपांडे, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, गिरगाव मुंबई ४; ८६, २ रु०.
११. **रेशमाचा कोश**–वसंत नागपुरे, अजय प्रकाशन, नाशिक; ६३, १=५०.
१२. **पैसे झाडाला लागतात**–दिनकर पाटील, जयहिंद प्रकाशन, झावबाची वाडी, मुंबई २; ८१, २ रु०.
१३ **लाखेचे माणि**–अच्युत बर्वे, आनंद पै, मरीन ड्राईव्ह, मुंबई २; ८४, २ रु०.
१४ **चार्वाक**–श्री. वा. किर्लोस्कर, श्री. वा. किर्लोस्कर, शिवशाही, सोलापूर; १०६, २ रु.

१५. **अलौकिक संसार**–सौ. मालती बेडेकर, व्हीनस प्रकाशन, ४१० शनिवार, पुणें २; ५७ १=२५ रु०.

१६. **पत्यांचा बंगला**–सौ. उमाबाई भट, इनामदार बंधु, ९९१ सदाशिव पेठ, पुणें २; ५४. १ रु०.

१७. **अमृत**–मो. ग. रांगणेकर, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ६६, २ रु०.

१८. **रंगपांचालिक आणि दोन नाटकें**–रूपकध्यक, सौ. सरिता रेगे, खंबाला हिल, कलापद, मुंबई २६; ८८, ३ रु०.

१९. **चला आळंदीला**–श्रीकृष्ण साक्रीकर, पाप्युलर बुकडेपो, लॅमिंग्टन रोड, मुंबई ७; ७१, २ रु०.

२०. **इनामदार**–अण्णाभाऊ साठे, अभिनव प्रकाशन, जेरबाई वाडिया रोड, परळ,–मुंबई १२; ५६, १=५०.

२१. **जन्माची गांठ**–आ. कृ. सावन्त, वि. र. बाम, मुंबई ८०, १=५०.

२२. **विकलेल्या कल्पना**–म. वि. गोखले, कुलकर्णी ग्रंथागार, १८६ शनिवार, पुणें २; २०, ००=५०.

२३. **एकेकाचा आजार**– विजय तेंडूलकर, रामकृष्ण बुक डेपो, गिरगाव, मुंबई ४ ; ३२, ७५ न. पैसे.

२४. **चित्रगुप्त , अहो चित्रगुप्त !**– विजय तेंडूलकर, रामकृष्ण बुक डेपो, गिरगाव–मुंबई ४; ४०, ७५ न. पै.

२५. **थीफ् ! पोलिस**– विजय तेंडूलकर, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४ ; २३, ७५ न. पै.

२६. **इडली डोसा सुलूचा रामा**– अ. वा. वर्टी, चंद्रहास प्रकाशन, वर्टी कॉलनी, नाशिक; ४१, १ रू.

२७. **मॅकबेथ**– निवेदक, अजय आरोसकर, बोरा अँड कं. प्रा. लि. काळबादेवी, मुंबई २; ७१, २= २५

२८. **किंग लिअर**– (अनुवाद)— द. म. खेर, बोरा अँड कं. पब्लिशर्स प्रा. लि. काळबादेवी, मुंबई २; ७४, १=२५.

२९. **मर्चंट ऑफ व्हेनिस**– अनु.– दा. न. शिखरे, बोरा ॲन्ड कं. पब्लिशर्स प्रा. लि. मुंबई २; ८८, १=१५.

## निबंध-लघुनिबंध

१. **स्पर्शाची पालवी**– गो. वि. करंदीकर, पॉप्युलर बुक डेपो, लॅमिंग्टन रोड, मुंबई ७; १२८, ३ रु.

२. **सावरकर साहित्य नवनीत**–संपा. भा. द. खेर, महाराष्ट्र ग्रंथ भांडार; ४९६, १० रु.

३. **माशाचे अश्रू**–बाळ गाडगीळ, बोरा ॲन्ड कं. पब्लि. प्रा. लि.–मुंबई; ९६, १=५०

४. **येरा गबाळाचें काम**–राम कृ. जोशी, सिद्धार्थ साहित्य, बनाम हॉल लेन; मुंबई ४; ११२, ३ रु.

५. **राजवाडे लेखसंग्रह**–संपा. लक्ष्मणशास्त्री जोशी, साहित्य अकादमी, न्यू दिल्ली; ३१०, ५ रु.

६. **ताटी उघडा ज्ञानेश्वरा**–श. कृ. जोशी, मनोहर ग्रंथमाळा, टिळक रोड, पुणें २; १०६, २ रु.

